# डेकॅथलॉन



श्रीधर तिळवे

डेकॅथलॉन
श्रीधर तिळवे



प्रथमावृत्ती
१२ नोव्हेंबर २००४

प्रकाशक/मुद्रक
सतीश पाध्ये,
शब्दवेल प्रकाशन,
१३०३, 'अे', राजघाट रोड,
कोल्हापूर - ४१६ ०१२.
फोन : २६२ ६७ ६५

श्रीधर तिळवे
* मु. पो. नागेशी वांदिवडे, कुरेपाड वाडा
फोंडा-गोवा
* १६-५३-सी, 'तपोवन' ना. नि. प. -२
मालाड (पूर्व), मुंबई
मोबाईल ९८९२२-२९७३०, २८६४५८०८

मुखपृष्ठ संकल्पना : श्रीधर तिळवे
चित्र : 'विश्व मंडल', तिबेट, इ.स. १८००

मुखपृष्ठ रचना : पायोनियर ग्राफिक्स, कोल्हापूर

किंमत : रु. २००/-

## प्रेम

ते मोडलं
ह्यापेक्षा
ते होतं
हे महत्त्वाचं

## ज्ञानदास

## सप्रेम

# श्रीधर तिळवे ह्यांचे साहित्य

## प्रकाशित

### कवितासंग्रह

(१) एका भारतीय विद्यार्थ्याचे उद्‌गार (पॉप्युलर प्रकाशन)

(२) क. व्ही. श्रीधर तिळवे (पॉप्युलर प्रकाशन)

(३) स्त्रीवाहिनी (शब्दवेल प्रकाशन)

### समीक्षा

(१) टीकाहरण (अर्थात देशियता : आभास आणि वास्तव) (शब्दवेल प्रकाशन)

### आगामी

(१) मार्गी आणि देशी (समीक्षा)

(२) Conversation On Creativity (तत्त्वज्ञान)

(३) On Globalisation (वैचारिक)

(४) अफेयर डॉट कॉम (कादंबरी)

(५) चिन्हमीमांसा (समीक्षा)

(६) परिवर्तनवादी (वैचारिक लेख)


### धन्यवाद

नलिनी तिळवे, शांताराम तिळवे, सौ. सुमंगला तिळवे-नार्वेकर, प्रकाश नार्वेकर, उज्वला तिळवे, भारत तिळवे, भूषण तिळवे, दत्ता तिळवे, जतिन-स्नेहल नार्वेकर, प्रियवंदा नार्वेकर, निनाद-नपूर काळे, जयसिंग पाटील, मिलिंद गुर्जर, विलास कांबळे, सुहास-श्रीनिवास एकसंबेकर, राजीव कुमठेकर, कै. राजकुमार यादव, बाळकृष्ण शिर्के, मिलिंद पोतदार, शरावती यादव, शेखर जाधव, विलास काळे, श्रीराम पचिंद्रे, कीर्ती भाटिया, पायोनियर ग्राफिक्स, गर्जना मुद्रणालयाचे कर्मचारी आणि सतीश पाध्ये.

# अनुक्रम

## १. मराठी गझल

२. हिन्दी ग़ज़ल

## ३. मरणावली

## ४. अफवा

## ५. गाथा

# १. मराठी गझल

१.

बुडवून काठ तारूत राहिले गझल ही त्यांच्यासाठी
महावादळ ज्यांनी हसत पिले गझल ही त्यांच्यासाठी

रोगी आले बरे झाले हसले आणि निघून गेले
इस्पितळी जे कॅन्सर राहिले गझल ही त्यांच्यासाठी

आसवांना आत घेतले हुंदक्यांना आत घेतले
घर ज्यांनी पाहुण्यांना दिले गझल ही त्यांच्यासाठी

आभाळ उगवले नाही पौर्णिमा तर माहीत नव्हती
चन्द्र तरी जे झाले किलकिले गझल ही त्यांच्यासाठी

मुखवटे जे रागाने श्री उठले त्यांची क्षिती नाही
मैफिली जे चेहरे राहिले गझल ही त्यांच्यासाठी

२.

आता कुठे तिला जरा कळत चाललो आहे मी
डोळ्यांनो रडू नका हसत चाललो आहे मी

खरेच इथे तुझ्याविना का कोणी नसे जीवना
तुजसाठी नाही इथे जगत चाललो आहे मी

परवरदिगार माझी जरा लवकर ऐक प्रार्थना
दुवा मजला लवकर दे मरत चाललो आहे मी

कधी केली बेरीज आणि केली कधी वजाबाकी
आयुष्याला कवितेने गुणत चाललो आहे मी

काल मी आंधळा आणि आज पांगळा झालो मी
अेकेक माझा अवयव पुरत चाललो आहे मी

शब्द अश्रू दुःख माझे चमत्कार हा कोणाचा
शोधे म्हणे जो त्यास गवसत चाललो आहे मी

का चाललो कुठे चाललो कळत नाही काहीच
मात्र इतके कळते की सतत चाललो आहे मी

३.

कोणत्या पाण्यामधूनी झाड माझे जात आहे
एक पक्षी वहात आणि एक पक्षी गात आहे

कुणीतरी बोलवा आता जीवशास्त्रज्ञांना त्या
सांगा अेक चेहरा इथे माणसाला खात आहे

अरे कोण आहे तिथे सांभाळ जरा अश्रू माझा
पहातो मी कविता माझी कुणाकडे जात आहे

लढणार किती काळ मानव भुकेशी ह्या चिरंजीव
प्रत्येकजण दुसऱ्याचा देह आता खात आहे

गरज नाही ठेवा पाणी तुमचे हे तुमच्याजवळ
जखम माझी धुण्यासाठी अश्रू माझ्या आत आहे

काय म्हणावं माणसांना श्री मी ह्या मला सोडून
प्रत्येकजण माझा इथे आरसाच पहात आहे

४.

हुंदका हा माझा हाय तिच्या दारी जात नाही
कविता तिची आहे तिथे गझल माझी गात नाही

रुग्ण आहेत खोलीच्या आत माझी सर्व स्वप्ने
वैद्य पण पूर्वीसारखा त्यांच्याकडे पहात नाही

उदास मरण उदास जीवन उदासी उदास आहे
माझ्यातून आता माझे अस्तित्व वहात नाही

काय आहे उपयोग ह्या सुंदर पहाटेचा मला
अंगणी कुणी पूर्वीसारखे गुणगुणत न्हात नाही

विझला आहे सूर्य आणि विझले आहेत सितारे
डोकावतो दारात पण चन्द्र येत घरात नाही

स्मृती तिची आसवांनाच घेऊन येते परंतु
तिला पाहून हसण्याची सवय काही जात नाही

उघड्या करू नको तुझ्या वेदना तू श्री मैफिली
टाळ्यांसाठी हात तुझ्या हातात पण हात नाही

५.

शब्दामध्ये भुकेचे घोट घेऊन फिरतो आहे
आतङ्याने केलेले स्फोट घेऊन फिरतो आहे

आभाळास खिशात टाकून हिंडत होतो कळाले
चलनामध्ये नसलेली नोट घेऊन फिरतो आहे

कुणास ठाऊक बाकी आहे कितीदा मरणे अजून
अंगावरती कफनाचा कोट घेऊन फिरतो आहे

समुद्राला कळवा मिळणार मी त्याला अखेर म्हणून
सांगा नदीत मृत्यूची बोट घेऊन फिरतो आहे

तो सोडूच शकत नाही तूच त्याला सोडून दे
कविते अग श्रीधरसुद्धा पोट घेऊन फिरतो आहे

६.

समोर येता तिला मी टाळतो उगाचच
तरी दारी तिच्याच रेंगाळतो उगाचच

खिडकीतून सोडते ती तिथे मुक्त केस
मी मात्र इकडे जरा ढगाळतो उगाचच

काळोखात मला ती भेटणार नसते
काळोखास ह्या मी न्याहाळतो उगाचच

तसा तिचा माझा संबंध नाही काही
नाव तिचे घेतो नि ओशाळतो उगाचच

कळत असते रात्री आली नाही स्वप्नी
उठल्यावर तरी डोळा चाळतो उगाचच

हा चन्द्र पौर्णिमेत जाळणारच आहे
तरी ह्या चन्द्रास मी ओवाळतो उगाचच

दिवस माझे नाहीत कळते हे श्री तरी
एखादा सूर्य मी हाताळतो उगाचच

७.

जखम जेव्हा माझी जागवते रात्र
सूर्यालाही पाणी पाजवते रात्र

भेटत होती मला जी हरेक रात्री
स्वतःऐवजी आता पाठवते रात्र

असून डोळस तसा मी उपयोग काय
जर स्वप्नाना माझ्या चालवते रात्र

मिळेल चन्द्र शब्दात कदाचित म्हणून
गझल ही थेंबथेंब साठवते रात्र

जगू सांग मी आता राजू इथे कसा
दिवस हरेक माझा वाटवते रात्र

८

वेदनांचे भोवती माझ्या कडे होते
बन्द होतो मी दरवाजे उघडे होते

शोधु मी वस्त्रांचे पुरावे इथे कशास
इतिहासात सारे सूर्य नागडे होते

कुणीच नसते शकले थांबवू हा खेळ
मी आंधळा होतो क्षितिज लंगडे होते

दुःखामध्ये ह्याच राधेचे झाले पाणी
कृष्ण आटला तेव्हा हाती घडे होते

पटले नाही कधीच स्वतःशी माझे श्री
आजन्म स्वतःशी माझे वाकडे होते

९.

घडणार जे तेच अखेर घडत गेले हळूहळू
वाळवंट हृदयी माझ्या पडत गेले हळूहळू

सांगितले होते तिला प्रेम नको करू म्हणून
प्रेत पण माझे तिला आवडत गेले हळूहळू

पौर्णिमेचा सराव इथे तसा मलाही नव्हताच
चन्द्रही मग कण्टाळून दडत गेले हळूहळू

शोधीत जसे जसे गेलो ताकदीने सत्य इथे
कानी तसतसे स्वप्न बडबडत गेले हळूहळू

चितेमध्ये तुझ्या का श्री गोळा झाली आसवे
कोण असे चितेजवळून रडत गेले हळूहळू

१०.

(कै. राजकुमार यादव ह्याच्या स्मृतीस)

आभाळाचे प्राक्तन सहज तुझ्याकडे वळले असते
जर तुझे बहर वेड्या सूर्यामध्ये गळले असते

बरे झाले सत्याचे प्रेतच झाले गायब
तुझ्याकडे राहते तर कवितेत जळले असते

मेघामध्ये बसलो तर मेघच कानी पुटपुटला
''असतास तू खाली तर पावसाळे कळले असते''

बरेच झाले चन्द्र तुझा घेऊन नाही गेलास
कदाचित तुझ्या चन्द्राने त्यांचे आकाश मळले असते

आत्महत्या गर्भाशयात असतीस तू केली तर
पदोपदी मरण्याचे प्रसंग तरी टळले असते

११.

(मित्रवर्य निनाद काळे ह्यास)

घर क़से आधीच जाळलेले मिळाले
स्मशानही आतच पाळलेले मिळाले

कुठले पक्षी ते घरटे ज्यांना होते
आम्हास झाडही वाळलेले मिळाले

शोध सुवासाचा घेऊ इथे कुठे मी
वनात वाळवंट ढाळलेले मिळाले

घेऊन गेलो माझी संजीवनी पण
देवांकडे मृत्यू पाळलेले मिळाले

सुखाचा होईल प्रवास पुढील कारण
सुळावरती पाय भाळलेले मिळाले

१२.

(कै. अवधूत भट ह्याच्या स्मृतीस)

जेव्हा जेव्हा माझा अश्रू मरून जातो
सागर डोळी माझ्या पाणी भरून जातो

आभाळ येत नाही घेऊन सूर्य दारी
कवडसा निळा केवळ अंगावरून जातो

फुले घेऊन येती सोबत करार त्यांचे
सही शिशिरही त्याची खाली करून जातो

करू का पावलांची माझ्या मी चौकशी
रस्ताच हात माझा आता धरून जातो

होतो जेव्हा श्री मी एकटा आयुष्यात
सुगंध तिचा जखमी गझल अंथरून जातो

१३.

मृत्यूनंतर सखे मला एक कफन पुरे आहे
'मी स्वतः पांघरेन' तुझे एक वचन पुरे आहे

भीती का वाटते माझे थडगे उठून येईल
फूल ठेव तुझ्याहातचे एक वजन पुरे आहे

उडण्यास आहेत जाणतो लक्षावधी गगने पण
विद्ध माझ्या पाखरांना एक गगन पुरे आहे

प्रश्न आहे फुलांच्या अस्तित्व पुराव्याचा
शोधण्यास वाळवंट एक उत्खनन पुरे आहे

येत आहात का तुम्ही दफनभूमी पुन्हापुन्हा
दफनण्यास श्रीला केवळ एक दफन पुरे आहे

१४.

मृत्यूची अवकळा तिला बरी वाटते
त्यावेळी जिन्दगी मला खरी वाटते

हेही तसे खरे की मी माझा नव्हतो
मलाही सोबत ही कशीतरी वाटते

अवघडतो आजही स्त्रीशी बोलताना
आजही नवी स्त्री नवी दरी वाटते

आजही कालिन्दी डोकावते राधा
आजही हरेक लाट बासरी वाटते

कवितेचे इतकेच श्री ह्या कौतुक की
मृत्यूस ती माझ्या घरोघरी वाटते

१५.

इतकेच ह्या जगण्याचे सार हिंडत आहे
सर्वत्र माझे आयुष्य बीमार हिंडत आहे

जिवंत ठेवू माझ्या मी आसवाना कसा
डोळ्यात सर्व गोळीबार हिंडत आहे

जगताना इथे जरा जपून पाऊल टाक
हरेक हातात कफन तयार हिंडत आहे

इतकेच घडते आहे आता लोकशाहीत
घेऊन घटना हाती हत्यार हिंडत आहे

चलनव्यवस्थाच रद्द करून टाका तुमची
हरेक नोटेत बलात्कार हिंडत आहे

घड्याळ तुमचे आहे तुमच्याजवळच ठेवा
मी बांधून हाती काळ भरदार हिंडत आहे

नावे नका ठेवू माझ्या संन्यासाला
भगव्या झोळीत माझ्या संसार हिंडत आहे

सांगू कसे तुम्हास मी मला कसा वाटतो
अनंत निराकारी आकार हिंडत आहे

शोधू नको संगीत इतिहास बन्दीशीत
प्रत्येक तुकड्यात एक चित्कार हिंडत आहे

सर्प रुग्ण पडलेत शय्येवर आपापल्या
त्रयस्थ तरीही का घार हिंडत आहे

मी युगे जगत जाता हेच उमजून चुकलो
हरेक क्षणात तुझाच कारभार हिंडत आहे

पहातो पोटी तिच्या हजार वर्षे केवळ
गर्भाचा धूसर एक प्रकार हिंडत आहे

मी का विचारू माझ्या पक्ष्यांना त्यांची नावे
माझ्यात जर झाडांचा दरबार हिंडत आहे

जेथे जातो तेथे आयुष्य सुगंधित होते
सर्वच फुलात तुझा केशसंभार हिंडत आहे

महाधूर्त तुला म्हणू की अजाण समजू मी
तलवार कधी हाती कधी हार हिंडत आहे

सीमेवरचे सारे तू घट्ट कर पहारे
हुडकीत घोडा तुझा स्वार हिंडत आहे

विश्व म्हणजे केवळ आहे एक केऑस
श्वास वाजवत माझा गिटार हिंडत आहे

काय अटी ठरल्या तेही आठवत नाही
मज सावरत तरी तिचा करार हिंडत आहे

मी का पाहू सखये ताज्या ह्या बहरांना
जखमेत तुझे फूल वजनदार हिंडत आहे

हजारो दऱ्या तरी जीव देता येत नाही
हरेकी तव वक्षाचा उभार हिंडत आहे

निलम्बीत केलेत मी चन्द्र जीवनातुनी
का तरी पौर्णिमेचा प्रचार हिंडत आहे

केव्हाही मार हाक गरज वाटेल तेव्हा
तुजसाठी माझ्या घरात दार हिंडत आहे

तू पुरुषात तुझ्या मी स्त्रीत माझ्या गुंतलो
दरम्यान तरी काही निराकार हिंडत आहे

आयुष्य जगत आहे मी माझे ह्यापारच
माझ्यातील तरी काही त्यापार हिंडत आहे

चन्द्राचा तिचा नाही संबंध जाणतो तरी
भोवती माझे यान टुकार हिंडत आहे

कुणीच नाही आता फसणार मृगजळास
वाळवंटी मम रक्ताचा विस्तार हिंडत आहे

सर्वत्र भरून राहिलो मी बनून पुरुष जगी
प्रकृतीचा पत्ता नाही शृंगार हिंडत आहे

श्रोते उठून गेले गायक मरून गेला
शून्यात ह्या आता गंधार हिंडत आहे

काहीच नाही अर्थ पाहण्यात वाट उमगते
मनी तरीही आशा गर्भार हिंडत आहे

हत्ती गायब झाले माझे रानामधले
जंगली तरीही का सित्कार हिंडत आहे

कसा करू मायेचा हा पार मी सागर
वेदांचे कागदी भवती आरमार हिंडत आहे

सुराही सभ्यच होता हातही सभ्य होते
चोरपावलांनी पाठीत वार हिंडत आहे

गेले तारे पाहून ख्रिस्त शोधण्या पुढे
क्रूस तयारीसाठी पठार हिंडत आहे

बोलून गेले जे जे सर्व पाऊस होते
डबकी छापत त्यांची दुकानदार हिंडत आहे

घालून रोज भेटते स्वप्नाचे पायताण सत्य
पायपिटीत हा कसला चमत्कार हिंडत आहे

किती दार्शनिक आले किती दर्शने आली
हरेक उत्तर तरी का प्रश्नाकार हिंडत आहे

काळा पडेल नाहीतर आणखी काय होईल
विठ्ठलात भक्तातला अंधार हिंडत आहे

कसला पूर माणसे काठात सर्व बुडाली
पाण्यात मात्र त्यांचे घरदार हिंडत आहे

अेकदा उचलली होती ओंजळीने लाट
सागर माझे मानत 'आभार' हिंडत आहे

सूर्य विझून गेला माझ्या भाषेमधला
कवितेत उजेडही काळाशार हिंडत आहे

तिसरा डोळा फुटून आंधळा झाला शंकर
गर्भात पार्वतीच्या संहार हिंडत आहे

कळत नाही वैद्य कोण रोगी कोण ?
जखम शोधत नेमकी उपचार हिंडत आहे

सर्व जोड्या आहेत शिवशक्तीचा जोडा
विश्व पायात घालून चांभार हिंडत आहे

शिल्प हरवले तरी पाषाण तुझा आहे
छिन्नी एक दिलासा थंडगार हिंडत आहे

इतिहासी होते तसे सारे येशू ख्रिस्त
मधूनच कधी क्रूसाचा अवतार हिंडत आहे

कधीतरी हे जीवन एकदाचे संपेल
कवेत घेण्यास मृत्यू दिलदार हिंडत आहे

उभा जन्म सांगण्यास काही नव्हते जवळ
मृत्यू मात्र माझा तपशीलवार हिंडत आहे

शोधू शकलो नाही सत्य इतका जगूनही
भाकरीचा केवढा उपकार हिंडत आहे

येता हरेक क्षण देवाची छाया होवो
प्रार्थनेत एवढाच निर्धार हिंडत आहे

अश्वत्थामा कथेत मरून लोटला काळ
तेल मागत जख़म दारोदार हिंडत आहे

कोसळलो नाही मी शिशिरातही कधी
वक्षी दीप आईचा हिरवागार हिंडत आहे

विचार करून करून जीवन जगते आहे
मृत्यू मात्र निवांत निर्विचार हिंडत आहे

सारे क्षणाचे शत्रू सारे क्षणाचे मित्र
सांभाळीत संबंध किल्लेदार हिंडत आहे

प्रसवतो नवीन गर्भ प्रत्येक क्षणी मागे
अभ्यासत माझे संभोग इतिहासकार हिंडत आहे

मायेचा पदन्यास पाहू की घेऊ संन्यास
भगवा होकार हिरवा नकार हिंडत आहे

कोसळला न पाऊस उघडूनही दरवाजा
खिडकीभवती केवळ घनाकार हिंडत आहे

खून झाला माझा पण मलाच माहीत नाही
साक्षी देत तरी साक्षीदार हिंडत आहे

अमूर्तता अहिंसेची घोषणा ज्यांनी केली
मूर्तीमध्ये त्यांच्याच हिंसाचार हिंडत आहे

सर्व मुखवटे मी पुसून टाकल्यापासून
आरसा बनून चेहरा आरपार हिंडत आहे

एकदा फेडली होती देहातील तिची बाग
त्वचेत तिचा गंध उबदार हिंडत आहे

कोणी दिसत नाही वर्तमानात योध्दा
बातम्यात शोपीस म्हणून तलवार हिंडत आहे

जंगलात का येतील शहरामधले लोक
लाकडासाठी शहरी वखार हिंडत आहे

काय बिघडले दोस्त सूर्याच्या नकाराने
उजेडात बघ तुझ्या होकार हिंडत आहे

दशमस्थानी मला ग्रह गुंफायचे होते
अष्टमात हाय त्यांचा व्यापार हिंडत आहे

होणार कसे इथे संपूर्ण परिवर्तन
सर्वत्र म्हाताऱ्यांचा सत्कार हिंडत आहे

साऱ्याच माणसांचे दुकान आहे झाले
पाटी 'आज रोख उद्या उधार' हिंडत आहे

वाटून घेतला वारा ते सर्व शहाणे होते
वाटेत थांबले त्यांच्यात प्रहार हिंडत आहे

लोकशाहीचे आईस्क्रीम मोजक्यांसाठी
शीतपेटी मीठ म्हणून मतदार हिंडत आहे

कोणत्या अवस्थेमधून जात आहोत आपण
कुठेही जनता नाही सरकार हिंडत आहे

मेघ पेरून गेले मातीत महात्मे तरी
पाण्याची मागत भीक कोठार हिंडत आहे

शब्दास पाजून रक्त कविता वाढवत गेलो
हरेक ओळ जखमाकार हिंडत आहे

काढणार किती कर्ज आम्ही त्यांच्याकडून
का कफन त्यांच्या दारी वारंवार हिंडत आहे

पटवून देतात ते जिवंत सर्वच आहेत
शहरी का तरी प्रेतागार हिंडत आहे

वाढ नव्हे ही सूज कशी नियंत्रीत करू
लिंगात करमणूकीचा गुणाकार हिंडत आहे

लोकशाही ही आहे की ही रेसचे मैदान
इझमस् घेऊन बुकी हुशार हिंडत आहे

शब्दांनो मारून फुंकर विझवा सूर्य पाहू
तुमच्यात किती शक्तीचा मल्हार हिंडत आहे

समशेर फेकली पाहून योद्धांनी सुंदर फुले
पाकळीने कापीत गळा धार हिंडत आहे

निर्वाणात जा बुद्धा लपवत तुझे अश्रू
क्षेपणास्त्रांचा बाबा जयजयकार हिंडत आहे

एकदाच आदळली होती ईश्वराची देही लाट
ललाटात शोधत पाणी विचार हिंडत आहे

इतिहास चालला आहे पडत लालेलाल
शाईत रक्ताचा हुंकार हिंडत आहे

करावी कुठे कशी प्रार्थना मी शांतीची
मन्दीरी आता शस्त्रागार हिंडत आहे

त्यांना का असणार चिंता बियाणांची
हाती दर महिन्यास पगार हिंडत आहे

आयुष्य नाकारण्याची कुणात हिम्मत नाही
आयुष्याविरूद्ध मात्र तक्रार हिंडत आहे

शोधून न मिळेना सुखाचा थाग देहात
कोणत्या दुःखाचा टणत्कार हिंडत आहे

उलटून गेली युगे वाक्ये तशीच आहेत
पूर्णविरामानी आजही उद्गार हिंडत आहे

सत्य बोलता बोलता अलगद खोटे बोलतो
माझ्यातच कोणी एक गद्दार हिंडत आहे

निखारा टाचला आहे माझ्या हरेक ओळीस
शब्दही हाती घेऊन अंगार हिंडत आहे

तुमची तळी का नदीच बदलून टाकू
आमच्या पाण्यामध्ये चवदार हिंडत आहे

आयुष्यात आता दिसणे चपणेच उरले
आराप झाले गायब अविष्कार हिंडत आहे

सोने संपले तरी खोदणे सुरूच आहे
संस्कृतीत अजून म्हणे कोलार हिंडत आहे

गुप्तरोग झाले तरी खुर्ची नका सोडू
लिंगाचा तुमच्या केवढा आधार हिंडत आहे

प्रकाशाचा कोठल्या मृत्यू होणार आहे
सूर्यावर भूंकत रोज अंधार हिंडत आहे

पर्वास वाटत आहे लोकशाहीत लाज
दाखवत अवयव थाटात जार हिंडत आहे

समाजव्यवस्था आहे कोमामध्ये गेली
इस्पितळी अवयवांचा बाजार हिंडत आहे

क्रूस बावन्न पिसतात पाच मोठे खेळाडू
युनोत किती महान जुगार हिंडत आहे

झालो बाद मी तरी आता चिंता नाही
प्रेक्षकात मी मारलेला षटकार हिंडत आहे

गळाली पाने अठरा अजून उमजत नाही
कोणत्या फांदीवरून खार हिंडत आहे

सर्व सत्य शोधकांना एकच प्रश्न पुसला
उत्तरी आता म्हणे व्यभिचार हिंडत आहे

शोधून आण शीळा जंगलातून त्यांच्यासाठी
पावलात म्हणे त्यांच्या उद्धार हिंडत आहे

श्री स्टार्ट इमिजियेटली इंडिया इज सिरीयस
सर्वच पोस्टात एवढी तार हिंडत आहे

*

लिहिणार कशी होती सटवाई माझे नशीब
जन्मताना ईश्वराचे मी हात तोडले होते

*

जगण्यामध्ये मजा होता खिशामध्ये खुदा होता
चिरंजीव भव पापण्याचा स्वप्नांना दुवा होता
काय सांगू दोस्तहो माझ्या साम्राज्याची गोष्ट
कुंतलाचा पहारेकरी त्यावेळी राजा होता

*

जडामध्ये काय आहे देहामध्ये काय आहे
चैतन्यात काय आहे आत्म्यामध्ये काय आहे
सत्यशोधाशी आहोत इतके आम्ही एकरूप की
सत्याविना आमच्या स्वप्नामध्ये काय आहे

*

भस्मासूर हा भुकेचा भटकत आहे हात ठेवत
भल्या भल्या लोकांची एका दाण्यात गेली वर्षे

*

मी उघडत होतो खिडकी तू जखम खोलित होतीस
मी आनंद शोधत होतो तू अश्रू ढकलित होतीस
मी इकडे नग्न होतो तूही तिकडे नग्न होतीस
मी वस्त्र शोधित होतो तू कफन पांघरित होतीस

*

प्रत्येकाची नजर म्हणजे फुलांचा काटा बनलाय
इथला हरेक मार्ग आता स्मशानाचा फाटा बनलाय
राजूने अहो काल तिच्या डोळ्यामध्ये जीव दिला
एकाकी अफवेचा बहुधा आता बोभाटा बनलाय

*

डोळ्याच्या प्यालातून आयुष्याला नशा आला
हाताच्या विळख्यातून पापाला मजा आला
ओठातून तिच्या माझे आयुष्य वहात होते
चुम्बन मिळणार नाही ओठातून दुवा आला

*

आतापर्यंतची कधी हयात वाचलीस का
सखे ती पेपरमधली जाहिरात वाचलीस का
कंटाळून गरिबीस माझ्या सोडून गेलीस परंतु
मरणाची खबर माझ्या खात खात वाचलीस का ?

*

फुलामधले कोमल क्षण तुझ्याच पक्षात ठेवेन
एखादे माझे चुंबनही जाताना वक्षात ठेवेन
आयुष्या आता चलतो मी रडू नको माझ्यानंतर
तुझ्यामुळेच भेटली ती निश्चित मी लक्ष्यात ठेवेन

*

स्वप्नामुळे सत्यचेहरा सुंदर बनत जातो
उत्तराने केवळ प्रश्न समृद्ध बनत जातो
सत्य आणि स्वप्नापैकी प्रश्न कोण उत्तर कोण
शोधण्यात मी मात्र थडगे माझे खणत जातो

*

डोळ्यात अश्रू येता तरतरी वाटली
उदासी खोल माझी मला खरी वाटली
जगामध्ये जगलो मी तसा बराच काळ
मृत्यूची संगत पण इथे बरी वाटली

*

माणूस मी होऊ शकतो पतीतही
तू का सखे मला ईश्वर समजतेस ?

*

आसवांची गंगा आली नसती अशी पण
पापणीच हक्काची भगीरथ झाली राजू

*

विवाहमंडपी सांडत आहे हास्य ती सुखाने
माझी मृत्यू बातमी अकाली कळवू नका

*

बोलावू नका कोणी माझ्या जुन्या हास्याला
हास्यातही तीच असेल जी हसवू शकत नाही

*

आताशा श्वास माझे ताऱ्यावरती आदळत आहेत
शब्द माझे बनून मेघ आभाळात पळत आहेत
एकदाच ती मिठीत येता काय जादू झाली पहा
जगातली वाळवंटे सारी फुलात दरवळत आहेत

*

स्वतःलाच असे मारण्याचे प्रकार तुमचे मानतो
हुंदके नंतर ढाळण्याचे अधिकार तुमचे मानतो
जळता तुम्ही जाळता तुम्ही तरीही जगता तुम्ही
जिवंत सारे असल्याबद्दल आभार तुमचे मानतो

*

मांडीवरती तुझ्या जर मरता आले असते
डोळ्यात तुझ्या अश्रू होऊन फिरता आले असते
कहाणी माझ्या मरणाची रोज गाईली असतीस तू
मरून निदान ओठावरती उरता आले असते

१६.

हरेक कपडा जळतो दररोज
नवीन शिम्पी वळतो दररोज

कोण तो मार्क्स कुठले ते सत्य
आतड्यास मी दळतो दररोज

कोणती माणसे ज्यांच्या घरी
अन्नाचा ढग गळतो दररोज

श्री हे जीवन झाले पोस्टमन
मृत्यूनिरोप कळतो दररोज

*

चिमूटभर प्रकाश मी कवितेचा फेकला तर
म्हणे माझ्या आयुष्याचा तो शिलालेख झाला

१७.

टिकवण्यासाठी रात्र किरणांना हुकमी केले
काजव्यांनी स्वतःलाच सूर्याचे डमी केले

होळी करून त्यांनी साजरी केली दिवाळी
पुढच्या दिवसांना आम्ही विजयादशमी केले

वाटत होते हळूहळू काळ ही जखम भरेल
पण माझ्या जखमेने काळासच जखमी केले

ऐनवेळी फितूर झाले शिशुपालास सुदर्शन
आयुष्याच्या पटावरून वजीरास कमी केले

सत्य होतो की भय होतो प्रत्यक्ष की प्रतिमा होतो
पाहिले मी जे जे मी मी त्यांनाच मी केले

तारण म्हणून पडलोय जखमेकडे गहाण मी
काय करणार मला श्री कवितांनी हमी केले

१८.

तेराव्यास तेच होते ज्यांनी अश्रू गाळले होते
खात्रीसाठी खाण्याआधी प्रेतही चाळले होते

जगणे वाटत हिंडण्याची हातांना ह्या सवय होती
खिशामधील कफनामध्ये असणे मी पाळले होते

एका चरणात दिवस अन् दुसऱ्या चरणात रात्र होती
पायपिटीवरती ह्या माझ्या काळही भाळले होते

दाद तेच देत आहेत दुःखांना व्वा म्हणत आहेत
ज्यांनी कधी काळी माझे अश्रू फेटाळले होते

भरपूर हिंडलास तू श्री जंगलामध्ये चल आता
ज्या शहरी जगलास ते तुझ्याआधीच वाळले होते

१९.

अंगावरून माझ्या रात गात गेली
'चन्द्र हरवले आहेत' जाहिरात गेली

अधूनमधून मलाही जळायचे होते
पणतीही विसरून मागे वात गेली

झडली सर्व झाडे पिकला हा पाचोळा
राने उडून शेवटी तिच्या शहरात गेली

कबर आणि घरातील मी भेद कसा सांगू
शोधण्यात दोन्ही सारी हयात गेली

समजले एवढेच मला प्रार्थनेविषयी
मागे ठेवून चर्च क्रूस वहात गेली

जगत कसा होतो कोणी विचारले नाही
मरणाची खबर मात्र रातोरात गेली

सांगू कोठून श्री मी कथा सुगंधाच्या
फुलांची दिण्डी जर नुस्तीच पहात गेली

२०.

जाळण्याआधी जाळण्याचे त्यांनी बील मागितले
जिवंतेल म्हणून स्मशानाचे नंतर सील मागितले

बलात्कार त्यांनी केला वस्त्रे मी चढवण्याआधीच
सत्कार करून माझा नंतर त्यांनी शील मागितले

खरेदीचा प्रयत्न केला मी स्वतःला विकण्याआधीच
नंतर का विकत नाहीस याचे तपशील मागितले

हृदयाचा प्रिझम होता विचारांचा प्रकाश
वर्णपटी करून काळोख पुन्हा नील मागितले

काय बोलणार वृत्तीला तत्त्वज्ञाच्या श्री मी आता
चितेत माझ्या जगण्याचे त्यांनी तपशील मागितले

*

माहीत आहे जमलेला प्रत्येकजण संत आहे
इतक्यात पण जाळू नका मी अजून जिवंत आहे

काळजी करू नका माझ्या घरामधल्या ऋतूंची
शिशिर जरी बाहेर उभा आतमध्ये वसंत आहे

२१.

तार्किक परिभाषा तयार होत नाही
ज्ञान हे अजूनही दार होत नाही

कुणास समजावतोस निर्वाणाची गरज
दुःखाचा कुणास इथे भार होत नाही

सरकार माता अन् दारिद्र्य पुत्र हे
पुत्राचा मातेस भार होत नाही

शब्दातून कसे सत्य तुला भेटेल
खिडकी कधीही दार होत नाही

दृष्टी विझवण्याचा अश्रूंनो सोडा यत्न
किरणांचा सूर्यावर वार होत नाही

मृत्यू बाळगण्याची श्री जरा सवय कर
जगणे जीवनाचे सार होत नाही

२२.

प्रार्थनेसाठी जेव्हा जेव्हा भाव मनी भोळे येतात
चर्चमधून येशु खिस्तास मारलेले मोळे येतात

पढण्याकरिता नमाज आम्ही बसतो जेव्हा अल्लापुढे
भीतीने पोटामधूनी कुराणाच्या गोळे येतात

माझ्याशी श्री जेव्हा जेव्हा सत्य बोलू पहाते तेव्हा
कानात घालण्यासाठी स्वप्नाकडून बोळे येतात

*

जगून काय उपयोग कुठवर सारे जगेल
काळामध्ये शेवटी प्रेतच माझे जमेल
अक्षरनिर्मितीचा सोस नाही राहिला
मीच टिकणार नाही तर कविता काय टिकेल

*

यमनियमांची नकोच लांब यादी
दुसऱ्याची असावी नर मादी वा गादी
ऐकून वेश्या म्हणती माहीत नव्हते
तासास मिळते आम्हास एक समाधी

२३.

दाराबाहेर सखे उभा वसंत आहे
घरात तू नाहीस हीच खंत आहे

निघालास कोठे बहर घेऊन असा
हरेक झाडाला शिशिर पसंत आहे

वाद का बावांनो करतो कबूल मी
माझा शब्द चोर तुमचा संत आहे

काळास जाणारा हरेक क्षण विचारे
तिळवे का अजून जगी जिवंत आहे

शोधणार शेवट तू कुणाचा कसा
इथला हरेक श्री अंत अनंत आहे

*

दारावरूनी जेव्हा मजला न्याल
बाहेर येऊन पुसेल माझा हाल
अश्रू येतील काहीच नका करू
कफनाचा द्या हाती फक्त रूमाल

२४.

दिवस तसा हा जुना आहे दिवस काही नवा नव्हे
काळाच्या मैफिलीतील सूर्य हाही ताजा नव्हे

धरतीत सर्व शरीर आणि गगनात आहे आत्मा
काळामध्ये काळीज माझे मी हाय ! माझा नव्हे

ही फुप्फुसे हे उसासे हे दिलासे अन् खुलासे
पहारेकरी माझेच सारे मी पण राजा नव्हे

तू बाळगू नको माझ्या वेषावरून गैरसमज
खिशात जरी कफन माझ्या मृत्यू माझा सखा नव्हे

जाऊ दे आयुष्य नव्हे अस्तित्वाचे हसेच हे
ईश्वराच्या हास्याचा हा मनमोकळा झरा नव्हे

निराश का तू रोगाने होतो आहेस श्री अशा
हा जरासा खोकला आहे हा काही दमा नव्हे

२५.

आसवांत आता नाहिल्यासारखं वाटतंय
जीवनास काहीतरी दिल्यासारखं वाटतंय

आयुष्य माझे काल भेटले आणि म्हणाले
''तुम्हाला कुठंतरी पाहिल्यासारखं वाटतंय''

बरे झाले उंबरठे दिलेस तू जाताना
घरी ह्या त्यामुळेच राहिल्यासारखं वाटतंय

येऊ देत स्मृती तुझ्या परक्या नाहीत मला
स्वतःलाच स्वतःमधून पिल्यासारखं वाटतंय

श्रीस तू घातलास हार काय झाले तूच बघ
आता त्यांना प्रेत वाहिल्यासारखं वाटतंय

२६.

पत्त्यांत गमावलेल्या डावावरती चर्चा झाली
हरवलेल्या राणीच्या नावावरती चर्चा झाली

अशीकशी अचानकच कविता झरली कागदावरती
शब्दामध्ये काल का घावावरती चर्चा झाली

अर्थमंडळ बैठकी भरल्या आलिशान हॉटेलात
माणसांच्या म्हणे तिथे भावावरती चर्चा झाली

चितेत ह्या कसा आलो कोठून आलो का आलो
पायात का माझ्या मूळ गावावरती चर्चा झाली

*

जाहिरातींचे सारेच आहे न्यारे
एकच घोष लक्स तुम्ही वापरा रे
सांगती आकाशसौंदर्याचे रहस्य
ईश्वरही म्हणे लक्सने धुतो तारे

२७.

हातात तुझा हा आता हात असणार नाही
चालेल पाऊल माझे मी चालणार नाही

वेढा देत राहतील पाण्याभोवती रात्री
तळ्यात हाय ! कधीही चन्द्र उतरणार नाही

असेच वहात राहील वारे हे चिरंजीव
भेटेल सुवास तुझा पण तू भेटणार नाही

जन्मतील मरून जातील अब्जावधी मानव
इतिहासात यातील कुणी आढळणार नाही

शोधतील लोक मला श्री मृत्यूनंतर माझ्या
सापडेल माझे प्रेत मी सापडणार नाही

२८.

जाऊ दे विसरून जाऊ प्रेम केले झरले होते
काकणानी मी चन्द्राच्या हात तुझे ग भरले होते

हाच का तो प्रदेश होता हीच का ती भूमी होती
वहर माळून जिथे कधी शहर आपले फिरले होते

नाव नाही जाणत माझे आता जरी कुठलीच लाट
बुडता मी कधीकाळी समुद्र सर्व हादरले होते

तू म्हणजे कविता होतीस कविता म्हणजे तू होतीस
तुझ्यात माझे जे जे बुडले कवितेत ते ते तरले होते

वारंवार पत्ते कशास तू तुझे दाखवतो आहेस
प्रेमामध्ये हुकूमाचेच एक्के सदा हरले होते

कळाले श्री जरी त्यांना मृत्यू माझा आहे झाला
लोक नेमके माझे प्रेत न्यायलाच विसरले होते

२९.

मृत्यूस पाहण्यास भूमी फिरवली आहे
रोजच निरोप येतो कबर हरवली आहे

का शोधतो आहेस आधार गर्दीमध्ये
कोणत्या समुद्राने लाट गिरवली आहे

आश्चर्य ते कसले शब्दात बहरते रक्त
मी प्रत्येक कवितेला जखम भरवली आहे

कसा करू भेद इथे मी जीवनमृत्युमध्ये
देहाने हरेक जर चिता जिरवली आहे

जाणलेस का तू श्री सत्य जगवण्यासाठी
स्वप्नांनी म्हणे आज सभा भरवली आहे

३०.

त्वचेस सर्व माझ्या जरी मेघ लगडले होते
उरी पुन्हा वाळवंट माझ्या सापडले होते

शोधित गेलो स्वतःस कधी खोदित गेलो स्वतःस
उत्खननात हाय तुझेच शहर सापडले होते

माणसे सर्व झाली का प्रवासी ज्यास त्यास
माझ्याऐवजी माझे लगेज आवडले होते

माझेही कधीकाळी श्री दिवस होते सारेच
माझ्याही अंगणी कधी सूर्य बागडले होते

३१.

इथल्या हरेक फुलास सुवास काही दिवस
वसंत ऋतूचा ह्या उल्हास काही दिवस

जपले असते अश्रू स्वप्नातील मोती समजून
असता तुझा मिळाला सहवास काही दिवस

वाळगतो का कोरा आरसा याची लाज
साऱ्याच चेहऱ्यांचा आभास काही दिवस

उचल तुझी ही पथारी हे सोडून चल घर
पाहुणा पाहुणा असतो घरास काही दिवस

कवितेसाठी कागद मिळत नाही राहू दे
वापर आता तुझ्या कफनास काही दिवस

अफाट फाटक्यांची बेफाट क्रांति येईल
नाऱ्यांचा तोवर ऐक बकवास काही दिवस

विसरून जाशील तू श्री करू नको काळजी
कापीत फिरतो गळा वनवास काही दिवस

*

कोठे आहे तुझी मुमताज हरेक घर पाहून गेला
काल माझ्या गल्लीमध्ये ताजमहाल येऊन गेला

३२.

गेलो मी घरी म्हटलं देईल चहा उपचार समजून
घेऊन पण जखम आलो मानलेले आभार समजून

पिऊन घेता डोळे मधाळ नशा अशी तिची चढली की
केली टिकटिक चन्द्रावर तिच्या घराचे दार समजून

ओळखला तिने अखेरी आशिकाना मिजाज आमचा
आणि अंतिम चुंबन दिले ठेवणीतला वार समजून

स्मशानामधून उठून तिच्या घरात आम्ही गेलो तर
घातला होता फासदोर हाय ! फोटोस हार समजून

राजवाड्यात श्रीच होता आणि प्रेतही श्रीच होता
नियतीने मग बुद्ध दिला आयुष्याचे सार समजून

३३.

माझ्यावर तुझा केव्हा सांग ग विश्वास होता
घेतला तो माझा नव्हे तुझाच ग श्वास होता

कवटाळलेस कधी मला पूर्ण पूर्ण होऊनी
कवटाळलीस तो मी नव्हे माझाच भास होता

सांगत आहेस कोणत्या ऋतूंचे तू तपशील
माझ्याकडे कधी तुझ्या फुलांचा सुवास होता

दैव माझ्या मालकीचे माझे तेव्हा नव्हते
हातही तुझा तेव्हा समाजाचा दास होता

श्री आता वहरामध्ये मन माझे रमत नाही
सदाच इथल्या फुलांचा चेहरा उदास होता

३४.

मार्ग सारे फुलांचे काफिले फुलांचे
फुलांकडून गीत मी चाहिले फुलांचे

आभाळात फुले तशी गाळात फुलेच
अस्तित्व कोणी फुलांना दिले फुलांचे

फुलांनीच जीव सदा दिला फुलांसाठी
प्रेत सदा फुलांनीच वाहिले फुलांचे

अशी कशी मृतप्राय फुले ही झाली
असे कसे फुलांनी रक्त पिले फुलांचे

सर्वांच फुले होती सगळीकडून सख्या
तरी काही खून मी पाहिले फुलांचे

श्री माझ्या पदरात काट्यांचाच हिस्सा
तरी उरी डाग जरा राहिले फुलांचे

३५.

सारे सुवास तिचे कफन हुंगून गेले
कबरीत जगलेले वचन हुंगून गेले

दिवस कसा उगवेल आभाळी ह्या माझ्या
सूर्य सारेच फक्त गगन हुंगून गेले

पायपीट सदनात सदाच वळली कारण
पाऊल तिचे सदा सदन हुंगून गेले

कशी मिळेल मुक्ती कोठे मिळेल मुक्ती
ईश्वर फक्त इथे प्रवचन हुंगून गेले

थांबलो मी पण श्री उमवली नाही कळी
वसंत सर्व फक्त उत्खनन हुंगून गेले

३६.

आत्म्याने जरी लाख रस्ते वळवले होते
शरीराने माझ्या आयुष्य पळवले होते

तुझ्याविना श्रीधर सुखरूप इथे आहोत
सुखांनी दुरून मजला निरोप कळवले होते

म्हणालो मी शपथ घ्या पूर्ण फुलण्याची पण
फुलांचे ऐनवेळी आजार वळवले होते

प्रयत्न लाख केले पोहचवण्याचे त्यास
शब्दांनी ऐनवेळी सत्य मळवले होते

३७.

लोक सांगती त्यावर माझा विश्वास नाही
जो येतो तो फुलांचा तुझ्या सुवास नाही

मी घराचा माझ्या झालो आता उंबरा
का वेळही तुला माप लवंडण्यास नाही

कशास विकू माझी मी चिरंजीवी निष्ठा
पराभव माझा अजुन तितका उदास नाही

इथे नको श्री शोधू तुझ्यासारखा कोणी
वेदनांचा कोणी लिहिला इतिहास नाही

३८.

ठोकताना भाषणे चेहरे गंभीर केले
हाय ! मेला तिळवे प्रेतांनी जाहीर केले

मृत्यूपूर्वी भेटा मी वेळ दिली भेटीची
फुलांनी भेटायास हाय किती उशीर केले

बुडलो नसतो कधीच पाण्यात माणूस म्हणून
ओळखून त्यांनी मला ईश्वरी पीर केले

आरोप कशाला मी नियतीवरती ठेवू
शब्दांनी लकीर ओढून मला फकीर केले

३९.

उठून यावे फुलांमधूनी गावे तुझ्याकडे
धुंद दोन घोट सुवासाचे प्यावे तुझ्याकडे

घेत रहावे भरभरूनी काही तुझ्याकडून
मीही काही भलतेसलते द्यावे तुझ्याकडे

बोलावे तू धुंदफुंद अन् व्हावे अबोल मी
हळूच माझ्या ओठांनी सरकावे तुझ्याकडे

फुलवावे मी सूर्य सूर्य रात्र गात्री ठेवून
पहाटे पहाटे कळ्यांनी उमलावे तुझ्याकडे

तुझ्याच दारावरूनी प्रेत न्यावे लोकांनी
आणि कोणी अेक फूल सरकवावे तुझ्याकडे

श्री तिच्या शब्दांना साऱ्या तुझ्या घरी बोलाव
आणि काही महिने म्हणतो रहावे तुझ्याकडे

४०.

पेशीपेशीत माझ्या बर्फ दाटला होता
किरण मागण्यापूर्वीच सूर्य फाटला होता

कुणास ठाऊक किती वरवर आणखी जाइल ?
भिऊन आभाळाने पतंग काटला होता

जनहो त्याच्याकडे तुम्ही लक्ष नका देऊ
फुलांनी त्याचा वेडा जीव झपाटला होता

खुडायास मी गेलो फुले बागेत तेव्हा
काट्यांनी माझा हळुच हात छाटला होता

स्वप्नांतर होत राहिले म्हणत लोक राहिले
सत्यांनी सदा याचा नेत्र बाटला होता

झुंजीची कशास श्री अपेक्षा इथे करतोस
हरेक घरात त्यांनी कुत्रा वाटला होता

४१.

जे तिला भावले ते मला भावले होते
नेत्रात माझ्या तिचे अश्रु धावले होते

वेदना खऱ्या दे मी नवस केला तेव्हा
अश्रुंना माझ्या तिचे नेत्र पावले होते

घेऊन निरोप ती निघून गेली तेव्हा
बघण्या मला फक्त शब्द डोकावले होते

पुतळे शोधत आहेस त्यांचे इथे कोठे
आयुष्य हे त्यांचे धुळीत मावले होते

उन्हाकडूनी इथल्या मरणार कशी थंडी
उन्हाळ्यांनीच इथे सूर्य गमावले होते

गुंतवला मन्दीरी पोटाचा गर्भ कुणी
ईश्वराला कोणते लोक चावले होते

चितेत श्रीला आहे समाधान एवढेच
एका कळीसाठी जीवन गमावले होते

४२.

सागर तुझे किती धोकेबाज होते
निव्वळ बुडबुड्यांचे आवाज होते

वा ! वा ! काय पण छान दगा दिलास
खुपसलेस पाठी तेही ताज होते

त्या कळ्यांच्या नाजुक शपथा नव्हत्या
ते सौंदर्याचे सुरेल माज होते

आखीव ती सर्व तुझी गणिते होती
चुकले जे जे ते माझे अंदाज होते

शोधू नको इथे एकल असे श्री काही
आयुष्य म्हणजे अेक कोलाज होते

४३.

दे फुलांना नाव माझे
तेच आहे गाव माझे

मिळेल तुला अश्रू जिथे
डोळे तिथे लाव माझे

मीच नाही ओळखणार
ओळखतील घाव माझे

जिंकलेस ते डाव तुझे
हारलेले डाव माझे

मी आता करतो एकच
मीच घेतो ठाव माझे

४४.

दीप जरासे जळतील मृत्यूनंतर माझ्या
लोक मला हे छळतील मृत्यूनंतर माझ्या

विसरून जातील फुले नाव जरी हे माझे
फुलपाखरे मळतील मृत्यूनंतर माझ्या

माझ्यासाठी झाली नाही कधी पूनव पण
चन्द्र जरा हळहळतील मृत्यूनंतर माझ्या

आयुष्य सळसळतच जगलो ह्या चितेच्या
ज्वालाही सळसळतील मृत्यूनंतर माझ्या

जिवंत असताना मी कदाचित नाही कळणार
कविता माझ्या कळतील मृत्यूनंतर माझ्या

४५.

कुणी ओरडत केला तर कुणी हसत केला
जगण्याचा यत्न मात्र साऱ्यांनी सतत केला

घेऊन जाऊ यास मी आता कुणाकडे
आरश्याने वापरून चेहरा परत केला

कोण सांग जगला इथे केल्याविना खून
कुणी केला उघडपणे कोणी लपत केला

आत्महत्या होतील त्यांच्या यशस्वी कशा
मरण्याचा यत्नही इथे त्यांनी जगत केला

जिवंत आहे नाही आज नाही माहीत
हवेस कालच श्रीने म्हणे श्वास परत केला

४६.

फुले मातीत पडायाला आता कुठे सुरवात झाली
वसंत उरात झडायाला आता कुठे सुरवात झाली

येणार नाही ती आता भाग्यरेखा बनून जीवनात
तळहात दोन्ही झडायाला आता कुठे सुरवात झाली

कसे देणार पुरावे तू तुझ्या जिवंत असण्याचे
प्रेत तुझे रडायाला आता कुठे सुरवात झाली

जाणार नाही ती एवढ्यात नष्ट होणार नाही इतक्यात
दुःख तिचे बागडायाला आता कुठे सुरवात झाली

मी कधी दुःखी होतो मला कोठे व्यथा होती
हुंदके हे आवडायाला आता कुठे सुरवात झाली

तू सोसणार आहेस कशी झालेली एकमेव हार
जय आधीचे सडायाला आता कुठे सुरवात झाली

४७.

(मित्रवर्य मिलिंद गुर्जर 'सॅजी'साठी)

अजूनही फुलतात फुले अजूनही सुवास आहे
अजूनही जंगलाचा लळा वसंतास आहे

अजूनही होत असते पौर्णिमा दर दिवशी
अजूनही तुझा चेहरा माझ्या आसपास आहे

अजूनही हातावरच्या करतेस गोळा रेषा तू
अजूनही तुझा सुवास येतो प्राक्तनास आहे

अजूनही भेटतात माणसे माणसांना
अजूनही माणसात जागा माणसास आहे

अजूनही होतात सण अजूनही होतात उत्सव
अजूनही दिवाळीचा दिव्यांना भास आहे

अजून अमृतासाठी समुद्रांचे होते मंथन
अजून विष पचवण्याची उमेद कण्ठास आहे

अजूनही रंगतात रंग अजूनही ब्रशतात ब्रश
अजूनही माणसाजवळ त्याचा कॅनव्हॉस आहे

अजूनही कविता फुलते अजूनही रसिक भेटतात
अजूनही आसवाची ओळख आसवास आहे

अजूनही श्रीधरला अधूनमधून भेटतो श्रीधर
अजूनही श्रीधरमध्ये श्रीधरचाच निवास आहे

४८.

प्राक्तनामधून जेव्हा वारा उगवला
पायाखालून माझ्या तारा उगवला

टाळला होता जरी ग्रंथ नियतीचा
तळहातावर तिचाच उतारा उगवला

शोधू लागलो मी कवितेचा चेहरा
इकडे तिकडे सर्वत्र पारा उगवला

प्रवासाची आहे हीच का ह्या अखेर
बुडताक्षणी जहाजे किनारा उगवला

तुकडे तुकडे केले श्रीचे जरी लाख
गझलेतुन साऱ्याच्या सारा उगवला

४९.

तुझ्याशी आता माझे जमणे कठीण आहे
फुलात तुझ्या मी सखये रमणे कठीण आहे

कितीही आण तू हसणे आता डोळ्यामध्ये
वाळवंट हे माझे रिमझिमणे कठीण आहे

कितीही असो क्षितिजे दूर मी पोहचणारच
पाऊल इमानी माझे दमणे कठीण आहे

आता देहास माझ्या तुझा देहच पाज
डोळ्यांनी ह्या तहान शमणे कठीण आहे

श्री आता ये करू मृत्यूवरतीच चर्चा
ह्यापुढे ह्या जीवनाशी जमणे कठीण आहे

५०.

कशास सांभाळू मी हे वृक्ष आणि झरे
उध्वस्त करून गेली मला तुझी पाखरे

पाहण्यास मी चेहरा पाठविले त्यांना
मोजत बसले हाय ! आरश्यावरचे चरे

कशास मांडू हिशेब दिवस अन् रात्रींचे
दाही दिशास माझ्या सूर्य तुझा पाझरे

नाही केली साथीत चौकशी लोकांची
मोजत बसले झाली किती रिकामी घरे

स्वतःहून मी इथे रडलो आहे केव्हा
तुझाच अश्रू येऊन डोळा माझा भरे

शांत शांत श्री झाला मृत्यूनंतर जीव
जीवनही आहे आता चाललेले वरे

५१.

संदेश जरी त्यांचे परमेश्वरी होते
लढाई झडली तेव्हा ते घरी होते

क्रांतितज्ञांचा ना तिथे उपयोग झाला
ज्यांनी शस्त्र उचलले ते वारकरी होते

त्यांच्या मेंदूला ना साधी इजा झाली
ज्यांचे हात तुटले ते कष्टकरी होते

हुतात्मा तर तू श्री झाला नाहीस ना
आताशा तुझी चर्चा घरोघरी होते

५२.

ह्या अंधाराला श्री आर ना पार आहे
तुझ्यासाठी खुले फक्त मृत्यूचेच दार आहे

हा महापुरुष इथे जन्मला, हा महापुरुष तिथे मेला
इतिहासाला मिळालेला हाच एक संस्कार आहे

कोण गौतम कोण अहिल्या कोण इंद्र कोण राम
दगडांनी का दगडांचा केला उद्धार आहे ?

जन्मलास तसा मरशील शेवटी जगणे म्हणजे
नसण्याने असण्याशी केलेला व्यवहार आहे

का करतोस गोळा शब्द का गातोस कविता ही ?
श्वासांनी का कधी दिला हवेला आधार आहे ?

का शोधतोस ब्रश अन् का शोधतोस नवा कॅनव्हॉस
घटना ह्या बेरंग आणि आयुष्य निराकार आहे

पाहू नकोस वाट आता कुठल्याच माणसाची
माणसाला माणूस भेटणे हा चमत्कार आहे

कधी होती काळजी अन्न वस्त्र निवाऱ्याची
जन्म मृत्यू नोंदीपुरतेच जन्मले सरकार आहे

५३.

अजून किती भेदणार आहेत आरपार नकार तुझे
मृत्यूचेही उघडत नाहीत धड दार नकार तुझे

स्वतःही नीट जगत नाही मलाही जगू देत नाहीत
हे कसला करत आहेत व्यवहार नकार तुझे

मरतो रोज रात्री मी जन्मतो रोज दिवसा मी
हा कसला घडवत आहेत चमत्कार नकार तुझे

का करू काळजी मी माझ्या सखे भविष्याची
सांभाळताहेत आयुष्याचा कारभार नकार तुझे

मत्स कूर्म वराह नृसिंह सारे काही होतात हाय
माणसाचा घेत नाहीत अवतार नकार तुझे

का माझ्यापासूनही फायदा झाला त्यांना
वारंवार का मानत आहेत आभार नकार तुझे

मी मेलो लोक जमले शोक केला शव जाळले
पहात होते सारे होऊन निर्विकार नकार तुझे

५४.

एवढ्यासाठी शब्द मी नाकारले होते
ते बोलू लागले तेव्हा सत्य वारले होते

काळापुढे सारेच लावून रांगा उभे
क्षणात जन्मलेले क्षणात वारले होते

स्वागतासाठी तिच्या काहीच नव्हते जवळ
दारावर मी माझे शव उभारले होते

५५.

बेरीज वजाबाकी करण्यात अर्थ नाही
मृत्यूच येईल अखेर मोजण्यात अर्थ नाही

जगत होतो तेव्हा एवढेच कळत होते
जगण्यात अर्थ नाही कळण्यात अर्थ नाही

खांदेकऱ्यांनो अश्रू का ढाळता आहात
तुम्हीही मरणाराहात रडण्यात अर्थ नाही

५६.

जरी त्यांच्या भाषणामध्ये नम्रतेचे नारे होते
अहो मी पुकारले तेव्हा त्यांच्या तोंडी जारे होते

फादर मी कसे वाचू अंधारलेले बायबल तुमचे
येशु ख्रिस्त जन्मला तेव्हा माझ्या खिशात तारे होते

काय आश्चर्य अंधारात शतक सारे लोटले म्हणून
पूर्वेवरच्या सूर्यावर पश्चिमेचे पहारे होते

काय झाले वाचले नाहीत आयुष्यग्रंथ मी म्हणून
मृत्यूने लहानपणी पाठ केलेले उतारे होते

विनातक्रार मी केली होती आत्महत्या श्री कारण
येऊ ... मी विचारले तेव्हा तिच्या तोंडी जारे होते

५७.

कौतुक करावे असे काहीच उरले नाही
आयुष्य माझ्या कधीही मिठीत शिरले नाही

कामे त्यांची त्यांची साऱ्यांनाच होती श्री
मेल्यावर माझे कुणी प्रेतही पुरले नाही

५८.

(मित्रवर्य विलास कांबळेसाठी)

पायाखाली धरती डोक्यावर आकाश
आयुष्य आहे अपुले चाललेले सावकाश

कसलाही नाही सल कश्याची नाही खंत
दिलाश्यांचा हसत पहातो आहे विनाश

ना सत्याचा शोध ना स्वप्नांचा सोस
कसलाच नाही पाश कशाचीच ना तलाश

प्रत्येक जन्म आता हेच सांगतो आहे
माणसास मिळतो इथे मृत्युएवढाच प्रकाश

एक जग होईल नष्ट तुझ्यासोबत तरीही
तसाच राहील काळ तसाच राहील अवकाश

५९.

तिथेच थांबते आहे पुन्हा पुन्हा कहाणी
एक होता राजा त्यास एक होती राणी

चरणांनो प्रथम काढा पादत्राणे बाहेर
चालायाचे असते स्वप्नावर अनवाणी

निमूट चालत राहते कागदी रस्त्यावरती
माझ्यापेक्षा आहे माझी गझल शहाणी

उपयोग काय होणार आहे शहरी हिंडून
वास्तव इथले बहिरे विस्तवास ना वाणी

जगण्याविषयी कसली श्री आता चर्चा नको
फार फार ही आहे क्रिया कण्टाळवाणी

६०.

मृत्यूही झाले माझे उपयुक्त समाजाला
काहींच्या कविता झाल्या काहींच्या अफवा

कुणाची हमी आता द्यावी कोणी इथे
वाळवंटच उठवतंय बहराच्या अफवा

गुणसूत्रे इतिहासी लपेटतो सलोख्याने
कारण त्यात आहेत माझ्या जगण्याच्या अफवा

तत्त्वज्ञान म्हणजे तरी दुसरे काय राजू
स्वप्नाभोवती फिरणाऱ्या सत्याच्या अफवा

६१.

कशाला इथे कुणी दुसऱ्यास दोष द्यावा
ज्याला त्याला मिळेल ओठाप्रमाणे पावा

मागावीत कशाला वृक्षाकडे मी फुले
कशास हवा श्वासास गंधाचा हेलकावा

मेघ भरून यावेत कशास गगनामध्ये
कशास माझा अश्रू मोरांनी बोलवावा

कशास अंगणातून तिने पहावे आकाश
चन्द्राने का अपुला चेहरा नीट करावा

सांगण्यासाठी श्री भविष्य जेव्हा जावा
माणसांना साऱ्याच त्याचा हात फुटावा

६२.

काय झाले विरले म्हणून अफवेसारखे गाव
सत्याच्या ह्या हातावरती जखम तुझी तू लाव

शब्दांच्या ह्या मैफिलीत घडते आहे अघटित
सांडत आहेस तू ओठ मी मोजत आहे घाव

फुलावरती फुलपाखरू कोरल्यापासून मी
इतिहासाचे हात आहेत हुंगत माझे नाव

पुन्हा आता भरेल इथे देहांचा बाजार
नुकतेच गेलेत विचारून संभोगाचे भाव

इतके का दुःख भावते समुद्राला माझे
लाटा खुद्द शोधित आहेत माझ्यासाठी नाव

६३.

घरी हिंडण्याचे हे दिवस नाहीत दोस्तहो
स्वतःत रमण्याचे हे दिवस नाहीत दोस्तहो

असो कशीही तलवार शत्रू कापा आधी
धार काढण्याचे हे दिवस नाहीत दोस्तहो

येऊन येऊन कोण मृत्यूशिवाय येईल
कफन टाळण्याचे हे दिवस नाहीत दोस्तहो

अश्रूंचा करून टाकू मिळून प्रलय स्वतःचेच
डोळे पुसण्याचे हे दिवस नाहीत दोस्तहो

श्री पडला पुढे सरका गिधाडे खातील प्रेतात
वेळ दवडण्याचे हे दिवस नाहीत दोस्तहो

६४.

दुःखावर माझा मी जीव जडवला होता
हवेत येताजाता अश्रू उडवला होता

न नाव इतिहासात म्हणून झाले काय
दुःखांनी माझा बुद्ध घडवला होता

निवांत शकलो बोलू येशूशी कारण मी
त्याच्यापासून माझा क्रूस दडवला होता

दिसला माझ्याभवती चिखल सदाच कारण
कमळांनी हरेक माझा श्वास घडवला होता

पाहिली मी कोलंबसची वाट कण्टाळून अखेर
समुद्रात मी माझा काठ बुडवला होता

६५.

त्यांनीच सदा फुलांशी नाते जोडले होते
चालताना ज्यांच्या पायी काटे मोडले होते

त्यांना मिळाले स्वर्ग नेहमी नवे नवे
ज्यांनी रोज प्राचीन ईश्वर फोडले होते

आहे सामान्य मी सामान्यांचाच कवी
इतिहासाने हळूच माझे नाव खोडले होते

मला गरज नाही भासली श्री कृत्रिम रंगांची
कॅनव्हासवर मी फक्त फुलपाखरू सोडले होते

६६.

व्याकूळ होऊन इथे गाऊ नकोस गाणी
फुलांनी कधी ऐकली आसवांची कहाणी

भवती माझ्या जरी महासागर पसरलेला
पिण्यासाठी नाही जहाजामध्ये पाणी

नव्या युगाचे आलेत गांधीवादी खरे
उंच बंगले यांचे आहे साधी रहाणी

भेटत आहेत क्षण का तेच काळास पुन्हा
पुकारली का आहे नियतीने आणीबाणी

श्री पसरू नकोस हात जगापुढे ह्या कधी
भिकाऱ्यांना नेहमी मिळतात खोटी नाणी

६७.

असू देत ही कशीही मेघांची कवाडे
जशी असेल माती तशीच येतील झाडे

पृथ्वीचा नाही दोष महिमा हा गतीचा
इथे धावता अंधार तिथे दिवस उजाडे

प्रत्येक शब्द श्री आहे श्वास माझाच
कविता म्हणजे मातीस मी दिलेले भाडे

६८.

बोलावले तरी ती वळली नाही कधी
प्रीत ही माझी तिला कळली नाही कधी

अश्रूवर माझ्या जरी ओठ टेकले तिने
दुःखात माझ्या ती उजळली नाही कधी

आयुष्यासही आला तिचाच गंध जिची
फुलावर साधी नजर खिळली नाही कधी

पाहून सूर्य जरी केला शृंगार तिने
दिवसामध्ये ती आढळली नाही कधी

अब्जावधी आले अब्जावधी येतील
पाऊलवाट पण ही मळली नाही कधी

साऱ्याच दोस्तांची एकच श्री तक्रार
कवितेत तुझ्या ती आढळली नाही कधी

६९.

आयुष्य हे असे कसे
एक स्मित बाकी हसे

असे कसे जगणे हे
जिवंत आपण कसेबसे

असे कसे अपुले प्रेम
तू मला मी तुला डसे

रस्त्यावर आले घर
उन्हात अजून उभे कसे

गवतानेच आग दिली
जळून गेले दोन ससे

चल सोडून संसार हा
जगून झाले पुरेसे

जन्म अवघा झिजून गेला
कवितेचे उरलेत ठसे

७०.

असे होते की तसे होते
की साऱ्याचेच हसे होते

हरवला चेहरा तेव्हा
भोवताली आरसे होते

त्या फुलांच्या कथा नव्हत्या
ते काट्यांचे वळसे होते

कविता ही माझी तशीच
अश्रू माझे जसे होते

७१.

जगण्याच्या वेरजेमधली मी वजावाकीच होतो
आयुष्य आले आणि गेले मी तसा खालीच होतो

कशी जगू मी ज्ञानेश्वरा ज्ञानेश्वरी तुझी तू सांग
जी लिहू शकला नाहीस अशी तुझी मी ओवीच होतो

मृत्यूच्या सखे अफवेवरती विश्वासू नकोस माझ्या
ऐकणारी केवळ तू आणि उठवणारा मीच होतो

७२.

असा कसा जीव माझा अज्ञात साखळीत जातो
पोकळीकडून पोकळीमधून पोकळीत जातो

तसे माझे सुटतात प्रश्न काळामुळे पण काळ
पोकळीमधून येतो आणि पोकळीत जातो

कसा होशील बुद्ध तू लोकापुढे जगातील
प्रत्येकवेळी जग तुझी पोकळी आवळीत जातो

दाणे होण्यातच असते सुख खरे पोकळीचे
कळते पण प्रत्येकवेळी पोकळीच दळीत जातो

पडतात पण सुटत नाही प्रश्न मला जीवनाचे
शब्दांनी मी ज्ञानाची पोकळी मळीत जातो

चंगीझखान वनतो मी कोणत्या गाफील क्षणी
कोण माझ्या आत माझी पोकळी आदळीत जातो

कृपया निदान मला तरी नका,म्हणू कलावंत
मी केव्हा आरामात पोकळी उधळीत जातो

गर्भातल्या पोकळीतून जीव हा येतो राजू
अखेरीला संभोगही कसा पोकळीत जातो

७३.

(मित्रवर्य बाळकृष्ण शिर्केसाठी)

जमता मेघ आभाळी इतकेच आता करतो
उघडतात ते छत्री मी पाऊस हाती धरतो

करू किती मी कौतुक जीवनाच्या यात्रेचे
पाठवतो चन्द्र रात्र सूर्य दिवस अंथरतो

नाव कसे भोवतालच्या गर्दीला मी देऊ
पाहून तिचा मुखवटा चेहरा माझा मरतो

मागत नाही पाणी मी समुद्राकडून
मेघात माझा घोडा निवांत एकटा चरतो

आयुष्य सुगंधित होते तिला भेटल्यानंतर
प्रत्येक माझा श्वास फुलामध्ये वावरतो

जगाशी करतो आहे सुखाने मी संसार
जीवन मला पसरते मृत्यू मला आवरतो

७४.

(संदर्भ : रजनीश आश्रम)

आठवण माझी झरता संभोग घे
संभोग जुना बहरता संभोग घे

संभोगातच असतो माणूस जिवंत
देहात मृत्यू फिरता संभोग घे

आलीस का समोर टाळूनही मी
विसरण्यास मला पुरता संभोग घे

वस्त्रांनी येणार नाही परतवता ते
घरात वादळ शिरता संभोग घे

फाट्यावरतीच मार ह्यांची ही सभ्यता
बिनधास्त आनंदा करता संभोग घे

आत्मा कुठे केवळ पोकळी आहे
पोकळी पेलण्याकरता संभोग घे

जगणे म्हणजे सतत संभोग करणे
देह हा माझा मरता संभोग घे

देहाच्या ह्या डोही देहाचाच तरंग
देहाच्या अंगाकरता संभोग घे

७५.

ईश्वर सुजला पाठीवरती मी काय करू ?
दिसता मूर्ती कर हे झरती मी काय करू ?

करूया सिताऱ्यांची लागवड म्हणताच मी
आकाशात उडाली धरती मी काय करू ?

किरण काही पाठवले बांधून सूर्याला
ते प्याले अंधार वरती मी काय करू ?

मृत्यूच्या कुत्र्यापुढे टाकू का हाडूक
भुंकण्यास येतीये भरती मी काय करू ?

बुडवू जहाज कोठे सांग राजू तिचे
जहाजावरच समुद्र तरती मी काय करू ?

७६.

वांझोटे जगण्यापेक्षा सरळ मरणे बरे
अनर्थ करण्यापेक्षा गप्प राहणे बरे

जोवर गंध आहे जगण्यात मजा आहे
गंध हरवण्यापेक्षा मातीत मिळणे बरे

चालताना सत्यात जखमीच होणार पाय
स्वप्नात रमण्यापेक्षा दुःखात जगणे बरे

मृत्यूच्याच अंगणात घोडा अपुला नाचतो
पहात बसण्यापेक्षा त्यावर बसणे बरे

मिळेल ना मिळेल जगण्याची पुन्हा संधी
प्रेम न करण्यापेक्षा उध्वस्त फिरणे बरे

७७.

(मित्रवर्य मिलिंद पोतदारसाठी)

काफिले हे आले कुठून कुणीकडे जात आहेत
सोबतीला अशा कोऱ्या कबरी का वहात आहेत

माती असशी मातीत जाशी अनेकांनी सांगितले
धरतीऐवजी सारे मग आकाश का पहात आहेत

काय शहाणे दीडशहाणे अजूनही पेटत नाहीत
महाग झाले पाणी म्हणून अश्रूत नहात आहेत

विकसनशील जंगलाची यादी मला नका दाखवू
दाखवा मला किती पक्षी घरटी बांधून रहात आहेत

ठेव राजू गांडीव धनुष्य कुठल्यातरी शमीवरती
धरण्यासाठीच पाय बाबा यांचे हे हात आहेत

७८.

गंजलेल्या एका सूर्याचा करुण आघात मी आहे
माझाच ज्यात आत्मा मेला असा अपघात मी आहे

न द्वैती न भांडवलदारी न अद्वैती न मार्क्सवादी
इतकेच ज्ञात आहे की मला अज्ञात मी आहे

कोणत्याही चर्चमधील प्रार्थनात मला नका शोधू
लोकहो नीट पहा इथल्या हरेक क्रूसात मी आहे

मापू नका मला तुमच्या फुटपट्टीने कृपया एका
तुमच्या साऱ्याच शब्दामध्ये साऱ्या वादात मी आहे

अनेक शतके चाललोय पण मार्ग काही गवसत नाही
विज्ञानाच्या संपूर्ण जरी प्रकाशझोतात मी आहे

७९.

कशी करू बेरीज इथली कशी करू वजाबाकी
मीच आहे असा अनंत आणि मीच असा एकाकी

जीवनाचा जमाखर्च पाहून असे करशील काय
एखादे कफन असेल जमा कविता एखादी बाकी

असा कसा आहे अजब मद्यपी मी या जगाचा
जीवन माझी मदीरा तर मृत्यू इमानी साकी

कोणत्या लोकामध्ये तू आहेस आला राजू
दुःखाचा चिरून आंबा कवितेच्या वाटती फाकी

८०.

राजू परवा मरण पावला अशी काल बातमी आली
स्मशानाने संप पुकारला अशी काल बातमी आली

विज्ञानास घेऊन चाललोय कुठे ते विचारू नका
परमेश्वर आजारी पडला अशी काल बातमी आली

निश्चितपणे काल कोणी वृद्ध झाला असणार जगात
सूर्यफुलाकडे सूर्य वळला अशी काल बातमी आली

हिंडतो आहे हरेकजण वाळवंट पेल्यात भरून
मद्यामध्ये सागर बुडला अशी काल बातमी आली

शोध घेणं थांबवा आता राजूच्या त्या प्रेताचा
परवा तिच्या घरी आढळला अशी काल बातमी आली

८१.

भेटलेला सूर्य अधरात ठेवून फिरतो आहे
दिवस सारे तिच्या शहरात ठेवून फिरतो आहे

कुठेही मी गेलो तरी तिच्याकडेच जातो कारण
पाय मी माझे तिच्या घरात ठेवून फिरतो आहे

पाठवते ती उंबरे तिच्या डोळी साकळलेले
मीही एक भिंत तिच्या पदरात ठेवून फिरतो आहे

किती पडले किती झडले कशाचीही गणती नाही
कुणास ठाऊक किती भूकंप उदरात ठेवून फिरतो आहे

राजू, माझ्यासारखा जगी मूर्ख कोणी असेल का
सुगंध मी काट्यांच्या नगरात ठेवून फिरतो आहे

८२.

आत्म्याचा म्हणे पचवला धूप माणसांनी
आशाळभूत शोध लावला कुरूप माणसांनी

माझा गुन्हा हाच मी नग्न इथे हिंडलो
त्वचा चोरली माझी गुपचूप माणसांनी

कुणाकडे बंदूक आणि बॉम्ब कुणाकडे
सत्यास बसवले निवडक चूप माणसांनी

आत्मशांतीसाठी माझ्या इतकेच केले
लावले माझ्या पिंडास तूप माणसांनी

८३.

इतका कसा दूर आलो तुझ्या आठवणीपासून
सूर्य उगवतो रोज तरीही अंगणी नसते ऊन

कोठून येतायत आवाज सूक्ष्म कोसळण्याचे पहाड
की काळीज माझे आहे फुटते पृथ्वी आतून

बागडायालाच लागली होती बाग जर फुलांची
कोणत्या काळ्या जादूने गेली फुलपाखरे मरून

जुनीपुराणी होती तशी दोन काळजाची कथा
पृथ्वी तरीही ताजीच होती श्वासात अपुल्या भरून

ओळखून होतो सूरा आहे सभ्य तुझा तरीही
ऐनवेळी वळलो कसा तुझ्याकडे पाठ करून

८४.

कशास धरता शस्त्रे का अजुनी समज नाही
माणसाला जगण्यास युद्धाची गरज नाही

कळते सारे तरीही काहीही कळत नाही
मी होतो आहे कठीण की आयुष्य सहज नाही

प्रत्येक क्रांतीमधून का क्रूस जन्मतो इथे
एकीमधुनही का कमळाची निपज नाही

तत्त्वज्ञ सज्ज आहेत धनुष्ये घेऊन त्यांची
हाय इथे कोठेही पण दिसते सावज नाही

सारेच कैदी धूर्त त्याच तुरुंगात शिरले
आहेत ज्यास खिडक्या पण ज्यास गज नाही

८५.

काय मिळाले असे प्रेम करून मला
अश्रूसुद्धा गेले बघून दुरून मला

काही हळवी वचने काही हळव्या शपथा
आणि एक श्वास गेला पुरून मला

कसा टाळला तिने स्पर्शामधला धोका
कसे ठेवले होते मीही आवरून मला

कसा दावला होता तिने हुंदका तिचा
आले कसे नाही तेव्हा भरून मला

हा पहा मी झालो तुझाच एक शब्द
काळजावरती आता घे उतरून मला

आत्म्यावरती जरी चर्चा केली तिने
ओळखत होती नेहमी अंगावरून मला

जेव्हा पाऊले वळली तिची उंबऱ्याकडे
खिडक्यांनी होते नेले तरून मला

कशास आणली आहेस तीच जुनी फुले
येता नाही येणार पुन्हा बहरून मला

आभार कसे मानावे मी त्या आसवांचे
त्यांनीच दिले आयुष्य भरभरून मला

दाही दिशास तडजोड हाका मारीत फिरते
तत्त्वे माझी पाहून येते गहिवरून मला

भेटण्यासाठी जेव्हा क्षितिजांना निघालो
'परत फिरा' आला निरोप घरून मला

शब्दाची जयंती साजरी कर श्रीधर
हजार वर्षे झाली आज मरून मला

८६.

जवळ आहेत माझ्याकडे वसंत फार थोडे
लवकर वेच असतील जिवंत फार थोडे

पाहूया किर्तींना ती मृत्यूदण्ड देते आता
असतील आमच्यापैकी भाग्यवंत फार थोडे

जरी मी नेसवले परमेश्वर त्यांना श्री
झाले आहेत शब्दातील अनंत फार थोडे

८७.

जिथे जातो तिथे होतो मला तुझा आभास सारखा
येते डोळी दाटून पाणी जीव होतो उदास सारखा

तुला मुळीच कळले नाही काय करून ठेवले आपण
मला सारे कळते तरी जीव होतो उदास सारखा

कसा दाटून येतो माझ्या झाडामध्ये काळा शिशिर
मुळास माझ्या नेसवते कोण येऊन तुझा सुवास सारखा

इथेच का ग सुटले होते हातामधून आपले हात
इथेच येता कसा जातो तडा प्राक्तनास सारखा

कोणते ते दुःख आहे ज्याने काळीज होते व्याकूळ
घाव आहे कोणता जो बोलवतो आसवांस सारखा

८८.

हा कधीचा मी स्वतःला ह्या इथे शोधतो आहे
कधी मातीत झडतो आहे कधी आकाश खुडतो आहे

रोज भेटतो नवा वारा रोज भेटतात नवे ऋतू
कधी फुलातून उमलतो कधी पानगळीतून झडतो आहे

पृथ्वी फिरते सूर्याभोवती आणि फिरते स्वतःभोवती
कधी कवेत घेतो दोन्ही कधी स्वतःच फिरतो आहे

रात्रीनंतर येतो दिवस दिवसानंतर येते रात्र
कधी रात्रीत दिवस कधी दिवसात रात्र विसरतो आहे

येताना मी नागडा होतो जातानाही नागडाच असेन
का मी हे मग रोज असे कपडे श्री बदलतो आहे

८९.

प्रत्येक खेळी जरी मी आत्महत्या पहात केली
ऐनवेळी आयुष्याने मृत्यूवरती मात केली

कितीही ओरडून सांगा तुम्ही मानव पशु नाही म्हणून
शास्त्रज्ञांनी जमा तुमची किंग्डम ॲनिमलियात केली

न विचारता आम्हाला हे लग्नवय वाढवत राहिले
संभोगाला म्हणून सुरवात आम्ही ऐन वयात केली

काय करू घेऊन मुली तुझ्याकडून संभोग मी
क्रांति नेहमी अवयवांनी फक्त अवयवात केली

हातावरून उठून रेषा फिरत आहेत ग्रहाभोवती
नियतीने का कुंडली माझी मांडावयास सुरवात केली

लाखो युगे गेली तरी श्रीधर अश्रू ढाळतोच आहे
आयुष्याची सुरवात बहुधा उत्क्रांतिने पाण्यात केली

९०.

अंगावरती होते कपडे मेलो तेव्हा
लोक जमले होते नागडे मेलो तेव्हा

पडायाचे अखेरीस कोणी तू की मी
फुलात झाले होते झगडे मेलो तेव्हा

शरीर विनाशी तर आत्मा अमरच आहे
गजवजले दिलासे भावडे मेलो तेव्हा

चालू केली माझी मरताक्षणीच स्तुती
सारेच दोस्त पडले उघडे मेलो तेव्हा

मेलो तरी मिळेना आत्मा त्यांना श्री
सर्व धर्म झाले वाकडे मेलो तेव्हा

९१.

लादलेली एकमेकावर मी आणीबाणी असतो
जागताना मानव आणि झोपताना प्राणी असतो

जरी माझ्या कातड्याचे जोडे त्याने कमावले
चालताना परमेश्वर नेहमीच अनवाणी असतो

जरी आहे बनून गेला देह माझा अवघा बर्फ
देहात तुझ्या उतरताना मी फक्त पाणी असतो

जेव्हा विश्व हे असते मूक तेव्हा मी होतो मौन
जेव्हा विश्व बोलू लागते तेव्हा मी गाणी असतो

सभोवताली माझ्या शब्द जरी मूर्ख आणि वाचाळ
भाषेमध्ये चालताना मी गझल शहाणी असतो

९२.

मृत्यूवरती माझ्या लेख कुणी न लिहावा
मी मेलो हाच आहे जगलो याचा पुरावा

फुलाफुलात माझा हिंडावा एकेक शब्द
फुलपाखरांनी आणि आतील अर्थ वहावा

दारावरूनी न्यावे लोकांनी माझे प्रेत
अन् तिच्या खिडकीचा एक गज निखळावा

वाऱ्यामधूनी यावेत अखेरीस माझा शब्द
गझल लिहिता लिहिता माझा श्वास तुटावा

मिटावी सर्व भांडणे माझ्या देहासोबत
शत्रूंच्याही नेत्री अश्रू एक जमावा

चितेतही जळताना मी रहावे एवढे शांत
ज्वालेसही जळल्याचा लागावा न सुगावा

*

# २. हिन्दी ग़ज़ल

१.

ना देख ऐसे जाहिल की तरह
मेरा भी दिल है दिल की तरह

तमाम उम्र खुदाको ढूँढता रहा
आप सामने आये मंजिल की तरह

आपकी आँखों में डूब जाऊंगा मैं
सँभल लिजीए मुझे साहिल की तरह

किस किससे बचाऊंगा अपनी जान
जमाना घुम रहा है कातिल की तरह

मौत तो कमसे कम आसान हो
जिन्दगी कट गई मुश्किल की तरह

एक खंजर आया फिर दुसरा
मैं देखता रहा गाफिल की तरह

२.

तेरी उम्मीद अब किसे ?
तेरे मिलन की तलब किसे ?

मेरे आसपास मौत है
जिन्दगी मिली ? कब ? किसे ?

तेरा चेहरा माहताब है
नजर आयेगी शब किसे ?

लोगोंने सिर्फ आह सुनी
दिखाई दिये लब किसे ?

पुरी खुदाई हिल गयी
याद आई बेसबब किसे ?

३.

मुझे इस स्याहकी गहराई का पता नहीं
मैं खुद को जानता हूँ खुदाई का पता नहीं

मुझे इश्क के लिए सिर्फ यादें काफी नहीं
मुझे बदन का एहसास है परछाई का पता नहीं

तुममें उलझ जाऊंगा ये भरोसा मत करना
मैं इश्क करता हूँ वफाई का पता नहीं

मैं जहाँ गया वहाँ किसीसे इश्क कर बैठा
मैं जुदा था तुमसे जुदाई का पता नहीं

अब हूँ वही हूँ होने के सिवा कुछ नहीं हूँ
इतकी हकीकत जानता हूँ सच्चाई का पता नहीं

४.

सोचता हूँ कयामतसे गुजरही जाऊ
यहाँ जीनेसे अच्छा है कि मरही जाऊ

जुल्फ सँवरनेसे अब कुछ नहीं होगा
जिन्दगी जुल्फमें उतरना है उतरही जाऊ

दुनिया एक बिखराव के सिवा कुछ नहीं
अन्दर टूटा हूँ बाहर बिखरही जाऊ

ये मुहब्बतभी आखिर गमही देगी
तुम मिली इस खुशीमें क्यूँ न मरही जाऊ

मुसलमान न बन सका तेरी बन्दगी में
इल्जाम बनके अब तुम्हारे सरही जाऊ

जिन्दगीमें वो लुत्फ कहाँ जो मौतमें है
जहाँ मौत का मातम है मैं उधरही जाऊ

५.

मेरे फिराककी फिक्र ना कर चलता रहेगा आना और जाना
निकालूंगा रात तन्हा मगर सुब्ह की तरह तुम मिलने आना

आदमी क्या है मिट्टी तो है थोडीसी धूल तो उडायेगाही
अगर मैं हुआ मैला तो मुझे आँखोंकी जलसे तुम नहलाना

मोहब्बतका मजाक उडाताभी है और मोहब्बत करताभी है
आदमी तो है जिसे है आता खुदपे हँसना खुदको हँसाना

इश्क किसीसे जो करते नहीं वे इश्क पे चर्चा करते रहेंगे
दिवानगीपे फक्र करो तुम छोड दो पण्डितों को समझाना

दुनिया क्या है रिवाजों की बन्दीश अपना ख्याल गाती रहेगी
कर दो दिलको हलका हलका इश्क तो है सीटी बजाना

६.

तेरी आँखोंमें अजनवीपन मैं ख्वाबसा ठहरा हुआ
इक पलमें बदल गया है सारा जमाना गुजरा हुआ

तू मेरी है फिरभी मुझे तू मेरी लगती नहीं
तेरे दिलमें कोई और है मेरी तरह उतरा हुआ

तू सामने चुपचाप है मैं भी हूँ खामोशसा
है वीचमें कोई फैसला रुका हुआ ठहरा हुआ

तू आयी थी जीवनमें यूँ गमे दुनिया के इलाजसी
तूने किया ये क्या फिर जख्म कैसे गहरा हुआ

मुझमें देख या तू ना देख सूरत अपनी झाँककर
तेरे दिलमें रहुँगा मैं शीशेकी तरह बिखरा हुआ

यह इश्क का अंजाम है यह दर्दका ही हश्र है
जो रातको सैलाव था वह सुबहको कोहरा हुआ

७.

तन्हाईमें याद करके मुझसे प्यार करती होगी
मेरे घरपे खामोशी मेरा इंतजार करती होगी

फिरसे साथ नहीं दिया कामयावीने आज मुझे
मुझे मिलने नाकामी खुदको तैयार करती होगी

अव आदतसी हो गयी है टूटनेकी बिखरनेकी
मेरी मौत दिलके साजको तार तार करती होगी

इस उम्मीदपे जिन्दा हूं शहरमें कि कोई लडकी
मेरे इंतजारमें दिलको वेकरार करती होगी

*

तू नहीं समझेगा मेरी दुनिया का दर्द
तू दुनिया का मालिक है दुनिया नहीं

८.

खुदा बगैर खुदाई अच्छी लगने लगी
ये क्या हुआ जुदाई अच्छी लगने लगी

कही उनसे ए दिल इश्क तो नहीं हुआ ?
मुझे उनकी रुसवाई अच्छी लगने लगी

कुछ ना कुछ अच्छा अब होही जायेगा
उन्हें मेरी बुराई अच्छी लगने लगी

हर कोई चीजसे अपनी अब उब चुँका
जो चीज है पराई अच्छी लगने लगी

न जाने क्या होगा हश्र इस मैफिल का
हर किसीको अंगडाई अच्छी लगने लगी

चाँदसे भी प्रतिबिंब जियादा अच्छा लगा
खुदासे जियादा खुदाई अच्छी लगने लगी

आदत हो चुकी थी वैसे मुझे जुल्फोंकी
फिरभी उनसे रिहाई अच्छी लगने लगी

९.

जिन्दगी चलते चलते तेरे सीनेमें रुक गई
मै मरने जा रहा था मगर जीनेमें रुक गई

अल्लाहतक पहुँच जाती जीते जी ये कयामत
मयखानेमें तुम मिली और पीने में रुक गई

समुन्दर करता पार तुमतक पहुँच जाता
मगर माँझी की नजर सफीनेमें रुक गई

अल्लाहतक नहीं पहुँची कोई शय कोई हस्ती
कोई काशीमें तो कोई मदीनेमें रुक गई

१०.

पहुँचा नहीं हूँ मैं अभी कयामतसे कयामततक
पहले पहुँच तो जाने दे मुझे तेरी मोहब्बततक

कैसे तुझे पूछ लू दिलके अन्दर आऊ या न आऊ
मोहब्बत कभी रुकती नहीं किसी के भी इजाजततक

प्रत्येक इझम ओलांडणारा
प्रत्येक पेशीत टुरीझम सांडणारा
मला मिळालेल्या ह्या जन्मजात देणग्या
त्यांनी दाखवलेले भटकभवाने वर्णपट
मला निकामी बनवण्याचा करत नाहीत ना कट
अमावस्येला देऊ शकेन उसना
इतका काळोख आहे उरात माझ्या
त्याचा तर हा नव्हे प्रताप ?
प्रत्येक एकाकीपणामागे असते
एक चिरवेदना एक ताप
माझी जन्मसूत्रे पाहिल्यापासून
पाडला नाही कुणी माझ्या
शरीराचा एखादा तट
उचललाही नाही कुणी
प्रिझमचा एखादा वर्णपट

एकांत एवढा स्वार्थी
की एकाकीपण स्वार्थी

सत्याचे पाऊल त्यांच्याच डोळ्यातून दिसते
ज्यांनी स्वत:सह साऱ्याच दिशा
सोडलेल्या असतात वाऱ्यावर
पण ज्यांच्या आयुष्याच्या पारावर
त्या उमटल्याच नाहीत
त्याचं काय
आम्हाला दिलाय ज्यांनी जन्म
भयाच्या प्रयोगशाळेत
सुरक्षिततेच्या परीक्षानळीत
त्यांनी आरक्षित केलंय का कधी
ह्या प्रश्नाचे बिनचूक उत्तर
की प्रत्येक प्रश्न
परीक्षानळीत जन्मतो
काहीवेळा पळतो
आणि प्रयोगशाळेत मरतो
म्हणून सोडून द्यायचा

अलीकडे मी एकच करतो

दिसेल त्या सूर्यावर
क्रूस समजून
माझी गुणसुत्रे ठोकतो
आणि मोजत बसतो
माझ्या गर्भाशयातील छत्तीस पेशी
एखादी कमी होईल म्हणून

## ग्रह

सूर्याभोवती फिरणाऱ्या ग्रहात
एक ग्रह आहे वेगळा
त्याचा पृथ्वीवर परिणाम होतो
त्याला मी प्रेम म्हटले तर
आवाज वाढवू नका

आदित्यभोवती फिरणाऱ्या ग्रहात
एक ग्रह वेगळा आहे
त्याचा क्षमेवर परिणाम होतो
तसा तो पूर्वीही अस्तित्वात होता
असं सिद्ध झालंय
त्याला मी भारत म्हटले तर
आवाज चढवू नका

सहस्त्ररश्मीभोवती फिरणाऱ्या ग्रहात
वेगळा आहे एक ग्रह
त्याचा वसुंधरेवर परिणाम होतो
शोध लागल्यानंतर
तो माझ्याकडे पाहून हसला
जवळ आला म्हणाला
अ
व
नि स न तोलता
मला झेलू पाहतायेत तुझे वीर
आपल्या कृत्रिम डोळ्यांनी
त्यांना म्हणावं
दुर्बिणीतून अश्रू वहात नसतात
त्याला मी अजून काहीच म्हटलेले नाही

कधीकधी अंतराळयानातून
'मी...'
अशी साद देतो
एवढच

## काही माणसे

भाळावर आभाळ असणारे
आभाळाहून उंच असतात

त्यांच्या वामनसमृद्ध पावलात
खुलेआम पथारी टाकतात
अनवाणी दिशा
त्यांचा प्रवास असतो
अनंत रस्त्यांचे एकसामायिक समीकरण
सारथ्य करतो त्यांचे खुद्द सूर्य
जो हाकारतो शतकांचे कळप
किरणांच्या आसूडाने
त्यांना दम लागतो तेव्हा
पितात ते मृत्यूचा घोट
आणि श्रीकृष्णी हसत
बसतात पहात
मृत्यूची होणारी दमछाक
अगस्तीने फेकलेला समुद्र
अंगाखाद्यावर खेळवत
सहजगत्या

आणि काही माणसे
ती तर
स्वतःएवढीही उंच होत नाहीत.

## खिडकी

खिडकीतून पाहता येतं
बाहेरचं जग
पण तरीही असतात
खिडकीला गज

खिडकीच्या बाहेर एक जग

आत एक जग
आत अंधार
बाहेर प्रकाश
असं वरळतच आयुष्य जातं

आयुष्य चालतं सुरळीत
दोन तीन गुणसुत्रे नीट मिळाली तर
पण ते कुठं जातं
बाहेर की आतल्या जगात
की गजाभोवती चकरा टाकतं

प्रश्न तसाच सोडला
म्हटलं
प्रश्न आपला असतो
उत्तर आपले नसते
डोळे गच्चकन मिटले
बाहेरचं दिसेना खोलीतलं दिसेना
तेव्हा कळलं
साला आपण स्वतःच एक जग असतो.

## कारागृह

काही माणसं कारागृहात असतात
काही माणसांत कारागृह असते

काही माणसं कारागृहात रडतात
काही उडतात

कारागृहातील करांची संगत
नाजूक असते
प्रभाकर नसते

प्रत्येक कारागृह
एका मोठ्या कारागृहाची
छोटी आवृत्ती समज
अर्थात
समज म्हंजे
खिडकीवर वाढलेला नवा गज

कारागृहाच्या भिंतीवर
कविता लिहिणारे ग्रेट असतात
कारागृहाच्या प्रीतीवर मूर्ख
त्यांच्या संशोधनाचे गटस नाहीत
असं म्हणतात

काय शोधायचं
तुम्ही ठरवता
कसं वापरायचं
जेलर ठरवतो
एका नव्या कारागृहाचा शोध
उपयोगी असतो त्यांना
नवीन कैद्यांच्या भरतीसाठी

प्रत्येक कारागृहात
भरती कैद्यांचीच होणार
मग त्याला तुम्ही
गर्भाशय म्हणा
पृथ्वी म्हणा
अंतराळ म्हणा
हवंच तर
कविता म्हणा

## चीनची भिंत

चन्द्रावरून मनुष्यनिर्मित एकच गोष्ट दिसते
चीनची भिंत

चन्द्रावर प्रथम काय गेलं
कुत्रं की कुत्र्याचं भुंकणं ?

चन्द्रावर प्रथम गेलेला अंतराळवीर उद्गारला
ओह गॉड
मी फुसफुसलो
थँक गॉड आय ॲम नॉट अ सायंटिस्ट

चन्द्रावरच्या मातीचा खर्च
इन्फीनिट रूपये
त्यात किती जणांची माती आहे

हे गणित सुटलं नाही म्हणे
जागतिक गणितज्ञांना

रशियातील भांडवलदार
अमेरिकेतील कम्युनिस्ट
यांना करण्यात आलंय चन्द्रावर हद्दपार
अशी अफवा अजून
का उठली नाही आरपार

अवकाशातील कत्तलीच्या बातम्या
वाटतात छान वाचायला
कम्प्युटराईज्ड टीव्हीवर

चन्द्रावरून हद्दपार करण्यात यावा
हा प्रतिगामी संच गुरुवर
असा ठराव नुक्ताच झालाय

चन्द्रावरून मनुष्यनिर्मित एकच गोष्ट दिसते
चीनची भिंत
अवकाशतज्ञ म्हणाले
ती खचत चाललीये
भूमीतज्ञ म्हणाले
पृथ्वीवरील ह्या आश्चर्याचं जतन
व्हायलाच हवं
मी फक्त भिंतीवरून उडणाऱ्या
छोट्या मुलांच्या विमानाकडं
बोट दाखवलं.

## अवतार

परीच्या राज्यात हिंडून आलो
तेव्हा कळालं
प्रत्येक राज्याला सीमा आहेत

विश्वाच्या तळ्यात सूर्याचे मासे
पकडायला गेलो त्यांना
छातीचं जाळं श्वास खेचत
सूर्य नव्हे
तेव्हा कळालं

सूर्याचं कासव
तेही सुंदर
पण जमिनीवर पाऊल टाकलं तर
कासवाचीच सिंहीण झाली

म्हटलं मोहही पडायचा
कटीचा
कुणी सांगावं
हिच्या डाव्या डोळ्यात धनुष्य असेल
आणि उजव्या डोळ्यात सुदर्शन

आताचा जमाना शांतिचा
बुद्ध लेकाचा निर्वाण पिऊन गेला
करुणेचे गुणसूत्र
इतिहासात ठेवून गेला
मग पुढं काय
असंही वाटलं
गुणसूत्राचाच लाल झेण्डा झालाय
पण कुठलं काय
परीनं हाकललंच तिथून

इथं आलो
तेव्हा कळालं
प्रत्येक राज्याला सीमा असतील
पण इथं
सीमाचं राज्य आहे

प्रत्येक राज्याला सीमा आहेतच.

## घड्याळ

घड्याळवाल्यांचे पाच प्रकार असतात

घड्याळ शोधणारे
घड्याळ तयार करणारे
घड्याळ विकणारे
घड्याळ दुरुस्त करणारे
घड्याळ खरेदी करणारे

घड्याळाचा शोध ही एक सामाजिक प्रक्रिया असावी
घड्याळाचे मॉडेल फक्त बदलत गेले म्हणतात

घड्याळ बहुतांशी गोल असते
कधी चौकोनी असते
कधी त्रिकोणी
कधी षटकोनीही असू शकते

घड्याळात दोन काटे असतात
एक मोठा
एक छोटा
मोठा स्थूल वेळ दाखवतो
छोटा सूक्ष्म
मोठा सावकाश धावतो
छोटा वेगाने
छोट्याशिवाय मोठा धावूच शकणार नाही
असे वाटते

घड्याळात एक गजरही असतो
तो क्वचितच अचूक लागतो
अनेकवेळा आवश्यक असतानाही लागत नाही
लागतो तेव्हा झोपलेला माणूस जागा होतो

घड्याळातील आकडे क्रमवारच असतात
एकानंतर दोन
दोनानंतर तीनच
एवढे घड्याळाचे प्रकार बदलले
आकार बदलले
पण घड्याळाचे आकडे तेच आहेत

घड्याळ कुठेही असू शकते
घरात
टॉवरवर
संसदेत
कुठेहही

हातावरचे घड्याळ छोटे असते
घरातले मोठे
टॉवरवरचे सर्वात मोठे

माणूस कितीही मोठा असला तरी
त्याच्या हातावरचे घड्याळ छोटेच असते

हातावरच्या घड्याळाला
छोटा पट्टा असतो
हातावरच्या घड्याळासाठी
तो आवश्यक असतो

ज्याच्या दिवाणखान्यात भव्य घड्याळ
तो श्रीमंत
ज्याच्या हातावर घड्याळ नाही
तो गरीब
तो नेहमीच घड्याळवाल्यांना किती वाजले म्हणून विचारतो

घड्याळ जितके नवे
तितके अचूक आकर्षक लोकप्रिय
घड्याळ जितके जुने
तितके चुकीचे बोजड कांहीसाठी तरीही आकर्षक

घड्याळही चालून चालून थकते
बन्द पडते
ते दुरुस्त करता येते
पण कधी कधी जुन्या घड्याळाचे स्पेअर पार्टस
बाजारात मिळत नाहीत
त्यामुळे ते अडगळीत फेकावे लागते

घड्याळ शोधणारे श्रीमंत
घड्याळ तयार करणारे महाश्रीमंत
घड्याळ विकणारे अतिश्रीमंत
घड्याळ दुरुस्त करणारे उच्च
घड्याळ खरेदी करणाऱ्यांबाबत मात्र
ते कोणते घड्याळ खरेदी करतात
त्यावर अवलंबून असते त्यांची प्रत
ज्यांना घड्याळ खरेदी करता येत नाही
त्यांना प्रत नाही असे घड्याळवादी मानतात

काही घड्याळे नेहमी मागे पडतात
काही घड्याळे नेहमी पुढे जातात

अचूक वेळ दाखवणारी फार थोडी घड्याळे असतात
काही घड्याळे बन्द पडलेली असतात
तरीही काही माणसे
आपल्या हातावर घड्याळ आहे हे दर्शवण्यासाठी
ती हातावर बांधतात
घड्याळवाल्यांच्यात जमा होतात

घड्याळांची निर्यात करून
एखादा देश श्रीमंत होतो
घड्याळांची आयात करून
एखादा देश गरीब होतो
काहींना स्वतःच्या देशातील घड्याळे
आवडत नाहीत
दर्जा नसतो म्हणतात
काहींना स्वतःच्याच देशातील घड्याळे आवडतात
तीच खरी म्हणतात

घड्याळ सर्वत्र घड्याळ असले तरी
इंग्लंडमध्ये वेगळी वेळ दर्शवते
भारतात वेगळी
कारण घड्याळ शेवटी घड्याळ असते
सूर्याच्या हालचालीबरोबर बदलत जाते

मी जेव्हा परमेश्वराला
किती वाजले म्हणून विचारतो
तेव्हा तो मिस्कील हसतो
म्हणतो
'बारा'

घड्याळ कधीही मागे वळून बघत नाही.

## तीनतिघी

पहिल्या दिवशी
ती आली पिवळी आशियन
म्हणाली
दहा पैशाची साखर दे
मी म्हणालो
दहा पैशाची साखर येत नाही

मग ती लैंगिक हसली
(माझ्या आयुष्यातलं पहिलंच लैंगिक हास्य)
मी निमूट दहा पैशाची पन्नास ग्रॅम साखर दिली

दुसऱ्या दिवशी
ही आली गोरी युरोपियन
म्हणाली
पंधरा पैशाची चहापूड दे
मी म्हणालो
चहापूड आता अठ्ठावीस रुपये किलो झालीये
तिने मग आपले वक्ष लैंगिकवले
मी तिला चहापूड दिली

तिसऱ्या दिवशी
ती-ती आली जाडजूड काळी आफ्रिकन
म्हणाली
दूध दे
मी म्हणालो
हे किराणा मालाचे दुकान आहे डेअरी नाही
समोर आहे तेथून घे
ती संतापली आणि निघून गेली

चौथ्या दिवशी मी सरळ
तिळवे भांडारचा बोर्ड उतरवला
आणि चहाची गाडी काढली.

## बेकाराच्या कविता : १

चिमूटभर कागद पदवीचा वाटला एक अफाट आभाळ
सर्टिफिकेटवरील एकेक शब्द मोडून टाकेल सारा काळ

खुर्चीतून गेलो पाहुण्यांकडे म्हटलं झालाच चन्द्रप्रवास
दरेक पावलात होता हत्ती डोळ्यांभोवती स्वप्नसहवास

घेतली शपथ रुग्ण जंगलात फुलवेन मी नवा वसंत
अनंत होईपर्यंत जाईन भोगत माझा मी अंत

चिता जावी होत तसा होत गेलो ह्या व्यवस्थेत थंड
माझेच गेले इस्पितळ कोमात ज्याने इथे केलं बंड

## बेकाराच्या कविता : २

सूर्याभोवती फिरावी पृथ्वी तशी नकारघण्टा फिरायची माझ्याभोवती
वाळवंट चालायचे डोळ्यामध्ये चिता गजबजायच्या देहाभोवती

पोटातली भूक मेंदूच्या भूपृष्ठांना भूकंप हातांनी उसवायची
ज्वालामुखीचे थंडगार पाचोळे जमवून एखादी कविता सांडायची

थकून मग देह विसावयाचा स्वप्नातही नोकऱ्या फुलायच्या
नो व्हेकन्सी अनुभव पाहिजेच्या शतपावल्या डोळ्यात वितळायच्या

## बेकाराच्या कविता : ३

वाटलं वाटेत हक्काचा वधस्तंभ मिळाला तर उचलावा पापणीने डोळ्यात
जपावा जीवनासारखा विरावं खुणावणाऱ्या खिडकीच्या वादळात

करावी आत्महत्या म्हणतील लोक काल एक बेकार मरून गेला
बापाच्या चेहऱ्यावर सुरकुती वाढेल म्हणेल बरं झालं ऐतखाऊ मेला

कंपासाने आखावे कागदावर वर्तुळ तसे हे जग सभोवार असते
झाला पाऊल तुम्ही तरी जगास कुठल्याच दिशेची गरज नसते

## बेकाराच्या कविता : ४

फाटावी पँट ढुंगणावरती तसं आयुष्य फाटत चाललंय टराटरा
चितेत मला जाळून कसा प्रत्येक क्षण तराट चाललाय तरातरा

भेटेल तो माणूस पोटामध्ये मेंदू पुरून फिरत होता
शब्द माझा उपाशी आतड्याचा झेंडा करून फिरत होता

बापाला नोकरी आईला छोकरी माणसं मागून मागतात काय
सूर्यच नाही हो बोंबलताना आभाळ कधी उरी झेलतात काय

जाऊ दे साला आयुष्यच खोटं बेकार म्हणून बोंबलत हिंडू
प्राणामध्ये भिजत असतंच आत्महत्येचं सोंग कमालीचं गांडू

## जात

मला कोणी मशीनगन आणून द्याल का हो
मला घालायच्यात गोळ्या
इथल्या प्रत्येक प्रेताला
इथया प्रत्येक जातीला

आणि
जात विचारणाऱ्या जातीवंताला

जात !
ह्यांच्या बापाने
ह्यांच्या आईवर चढताना
विचारले होते का
तुझी जात काय म्हणून
असावं
म्हणूनच इथल्या प्रत्येक आईनं
आपल्या मुलाच्या आयुष्यातून
माणुसकीचे नऊ महिने नऊ दिवस
वजा केलेत

मला कोणी मशीनगन आणून द्याल का हो
मला आता घालायच्या आहेत गोळ्या
समग्र आयांच्या गर्भाशयांनाच
जेणेकरून नऊ महिन्यानंतर
दहावा दिवस उजाडणारच नाही
जातीचा

जात !
मला कोणी मशनीगन आणून द्याल का हो ?

**समज**

समज मला एक संभोग हवा आहे
आणि तुझ्याजवळ आहे एक संभोगयोग्य शरीर
ते मी मागितले तर तू काय करशील
होकारशील
नाकारशील
धिक्कारशील
की शिल शिल म्हणत सोहळ्यात जाशील
असंही होऊ शकेल
की माझ्याजवळ आहे एक संभोगयोग्य शरीर
आणि तुला हवा आहे एक संभोग
तर तू काय करशील
मागशील की गप्प बसशील

मी असं म्हणू शकणार नाही
की मला तुझे शरीर हवेच
तूही म्हणू शकणार नाहीस
की माझे शरीर तुला हवेच

शेवटी प्रश्न
विर्याचे कुंकू लावून हिंडण्याचा नाही
होकार नकाराचा आहे
आणि प्रश्न
आपण देऊ त्या उत्तरावर गप्प बसू शकतो
नाही का ?

किती सहज सोपं असतं हे

## डोंबारवाड्यातील एका मुलीस

वैठना है क्या साब म्हणून
विचारू नकोस मुली
गणपतीचे विसर्जन करावे इतके
पवित्र आहेत तुझे समुद्रस्तन
कुठल्याही आदर्शवादी फिनिक्सने
ओवाळून टाकावा जीव
एवढी पवित्र आहे तुझी सूर्ययोनी
थांब
उघडे करू नकोस तुझे
भडव्यांनी कैद केलेले स्तन
दाखवू नकोस तुझी
आतडे वाहणारी योनीसेवा
संभोग करून विकून
थकले असतील ना तुझे अवयव
हे पन्नास रुपये घे
इतकेच आहेत माझ्याजवळ
राग मानू नकोस
रुपयात तुला विकत घेण्यापेक्षा
घरी जाऊन... वर चढणे पसंत करीन मी
चलतो मी
खुदा हाफीज !

## चरित्र

॥१॥

स्वप्नांनी पेन्शन घ्यायला केली सुरवात
की टेलीस्कोपच्या सुरकुत्या मोजव्याश्या वाटत नाहीत
शहर बदलणं तसं सोपंच असतं
ब्रॅण्ड बदलण्याइतकं
फक्त शरीराच्या सिगारेटीत
तंबाखूच राहील याची गॅरेन्टी असते हवी
काठी देण्यासाठी नवी
कलावंत विचारवंत नाक्यानाक्यावर असतात

॥२॥

ज्ञानातूनच दुःखाची निर्मिती होते
हे सत्य पचवण कठीण असतं
पहिली दहा वर्ष साधीच असतात
आपल्या अंगावरून इलेक्ट्रीक इस्त्री फिरू नये म्हणून
काळजी घ्यायला आईबाप समर्थ असतात

॥३॥

काय आहे
प्रश्नाचा फ्लॉवरपॉट टेबलातून उगवला
की झटकन नजर फिसकटते
वळून पहावं तर
आपली बेबी चेअर गायब झालेली असते
गादी फक्त रात्रीच अंथरायची
आईबापांची सक्त ताकीद मिळते
भिंतीवर नसलेली चित्रं शोधत
आयुष्य कसे छान वहाते
नियतीही उषाचा फॅन
छतावरती टांगून गाते

॥४॥

स्वप्न यौवनात आलं की
न्हाणं येतं वीर्य सांडतं
कुठल्यातरी यंत्रणेमार्फत

कम्प्युटरची ओळख होते
कॉलेजमध्ये तसे सारेच
फ्रीजमधून आल्यासारखे दिसतात

॥५॥

ही अशी
ती तशी
बशीपलिकडं बोलणं गेलं की
गळ्याची चहाची मागणी वाढत जाते
आधण तापत असते
भिंती मापत असते
जात धर्माचे रुपये असतील
तर जेवणही भरपेट असते
हा रुपया जवळ नसला
आणि कवी स्वभाव असला
की वाटत राहतं
फोडावा सूर्याचा बल्ब
पसरवावा अंधार पृथ्वीच्या फुटपाथवर वगैरे
अश्यावेळीही
माणूस चंद्रावर गेला आता सूर्यावरही जाईल
वगैरे वगैरे ऐकवणारे भेटतातच

॥६॥

वाटचाल सुरू होते ती अशी
जवळ असतो एक प्रिझम
एक आरसा एक टेलिफोन
स्केचपेन आणि बोरू
यांच्यातला वर्गलढा
खुर्ची आणि आरामखुर्ची
यांच्यातला सांस्कृतिक वाद
मृगजळ, सार्वजनिक नळ आणि वॉटरबॅग
यांची समाजव्यवस्था
हे सारंच ओळखीचं बनत जातं
उपाय असंख्य असतात
पण पाय दोनच असतात
याच्यातून तयार होत जातो गोधडीसारखा कॅनव्हास

आरसा खात बसतो चेहऱ्याचा घास
आणि मग रात्र गादी अंथराचची
थोडी आफिम प्यायची
आणि निवांत जांभई देऊन झोपी जायाचं
एवढंच हाती उरत

॥७॥

घर (असेल तर) वगैरे बँकेच्या कागदात पुरलं
की सुरू करता येतो धंदा
एक तागडीसुद्धा मिळत नसते मोफत दुकानासाठी
एका पारड्यात स्वतःचा मृत्यू घालून धान्य विकलं
की धंदा बरा चालतो
चहाचा खोका
साखरेची पोती
तेलाचा डबा
गव्हाच्या जाती
नारळाची शेंडी
आणि उधारीची खाती
यांच्या सहवासात
आपण केव्हा बनतो बारदान कळत नाही
आणि माणसं वळतात
ती फक्त गिऱ्हाईक म्हणून
गल्ल्यात एकेक नोट जमा होत जाते
दरफलक कधी कमी होत असतो
कधी वाढत असतो.

॥८॥

पार्श्वभूमी वगैरे लक्षात न घेणारेही भेटतात
आणि बायको नामक
एक डिपार्टमेंटल स्टोअर्सच हाती येतं
खरंतर नाईट लॅम्पमधला बल्ब
आणि बायकोची योनी
यांच्यात फारसा फरक नसतोच
मेंदूच्या पुस्तकाला
अनुभवाचे कव्हर घालेपर्यंत
चाळीशी उलटलेली असते

बायकोनेही एकेक स्त्रीसुलभ वस्तू उधळलेली असते
आणि एखाद्या गुढीपाडव्याला
हातातली काठी गुढी होते

॥९॥

लग्न का केलं ? एवढे का जगलो
असले प्रश्न कण्टाळदायक वाटले की
समजावं
थंडीत स्वेटर वापरायला हवं
म्हातारपणासाठी एक शोकेस शोधायला हवी
टेलीस्कोप डोळ्यांवर बसवायला हवी
इथून पुढचं जीवन
प्रिझमवर काढायचं असतं
एखादा वर्णपट
मिरवायचा असतो
मुल वाढत जातात
घरात फर्निचर वाढत जावं तशी
त्यांना स्वतःची टेलीस्कोप असते
प्रिझम असतो आरसा असतो
चेहरे तेच मिळणार का
हा प्रश्न सनातन असतो

॥१०॥

तर असं हे आयुष्य
आरश्याला असावा पारा
तसं चिकटलेलं असतं हे शरीर
त्याचा त्याग करताना काही सल राहतातच
उदाहरणार्थ
सरकार : जनतेने आत्म्यावर काढलेले कर्ज
संस्कृतीः नव्या थिएटरात दाखवला जाणारा मॅटिनी शो
वगैरे सत्ये सांगितली तरी
आपण काहीच का केलं नाही वगैरे
पण त्यांना थारा देऊन आपण काय मिळवणार असतो
पिक्चर तयार करणारे वारंवार भेटतात
सारेच शो बघायला वेळ कुठे असतो ?

॥११॥

एकदा मेंदूवर कव्हर पॅक केले
कीकाहीच शिल्लक रहात नाही
बावन्न पत्त्यात चारच एक्के असणार
आणि हुकूम फक्त एकदाच बोलता येतो
हे उमगलं की आपोआपच विरक्ती येते
आरसा कसा स्वच्छ होतो
आणि मग ज्ञान हा माणसाचा पिंड नसून
ती एक पारम्पारिक रूढी आहे
हे पटू लागतं
आणि कंपासपेटीपासून कफनपेटीपर्यंत
चाललेला हा प्रवास संपण्यापूर्वीच
कविता प्राणांतिक उपोषण करायला सुरवात करते
खांदा द्यायला चौघेजण पुरेसे असतात
शिर्षक ठरवायला गर्दी असते
कम्प्युटरचा अजस्त्र हात हिंडतच असतो.

## दॅटस ऑल

मी नर तू मादी
आणि समोर एक गादी
दॅटस् ऑल

मी उत्सव तू सोहळे
आणि तुझ्या पोटी डोहाळे
दॅटस् ऑल

मी अवकाश तू काळ
गर्भाशयात एक बाळ
दॅटस् ऑल

## यशवंतराव चव्हाण

१९६९

तात्या मला प्रथम भेटले
विचारते झाले
घोडा अडीच घरे का जातो
मी म्हणालो
प्यादे एक घर जाते म्हणून

१९७१
तात्या बाई मी आणि जनता
तात्या हुकूम बोला
तात्यांनी नकार दिला
बाई हुकूम बोलल्या
'बदाम'
सर्वांच्या हातातील पाने लाल झाली

१९७५
तात्या बाई मी आणि जनता
जनता म्हणाली
तात्या माझ्याबरोबरच बसा
तात्यांनी नकार दिला
बाई क्वीनच्या मागे
तोपर्यंत जनतेने सर्व काल्या घेतल्या आणि डाव जिंकला
बाई चिडल्या
निघून गेल्या
तात्यांनी बाईंना प्रथमच सोडले

१९८२
तात्या पुन्हा बाईबरोबर
मी म्हणालो
तात्या पुन्हा एकदा बैठा खेळ मांडूया का
तात्या म्हणाले
बाईंची अनुमती हवी
मी वजीर उंट हत्ती डब्यात टाकले

१९८४
तात्या काहीसे हसले
विचारते झाले
प्यादे एकच घर का पुढे जाते
मी म्हणालो
घोडा अडीच घरे जातो म्हणून

तात्यांनी बुद्धीबळाचा पट शांतपणे मिटवून टाकला.

## सरकारला असतात

सरकारला असतात दोन ड्रॉवर्स
एकात असतात
सूर्याची आकाशी हस्तलिखिते
दुसऱ्यात असतात
पृथ्वीची कायदेशीर कात्रणे

पहिला ओढायला जावं
प्रकाशाची किल्ली खुपसावी
स्वप्नातल्या अगडबंब नोटांचे हत्ती द्यावेत
लाच म्हणून
आणि वाचावे हस्तलिखित

दुसरा ओढायला जावं
मातीची किल्ली खुपसावी
पिकाची कात्रणं पृथ्वीच्या फायलीला अडकवून
क्लीप ओढावी
आणि मनसोक्त शिंकावे न्यायालयात

सरकारला असतात दोन ड्रॉवर्स
आपणाला दोन डोळे
पारडे बॅलेन्स व्हायला
आणखी एका डोळ्याची गरज असते
तो मिळेपर्यंत म्हणत रहावं
सरकारला असतात दोन ड्रॉवर्स

## संसार

एक होती म्हातारी
एक होता म्हातारा
फणसाचा वृषणाच्या
योनीमध्ये हिंडला गरा

होती ती मुसलमान
हा होता हिंदू पूर्ण
देशाच्या देशत्वात
अफवांचे झाले चूर्ण

म्हाताऱ्याने काढता बुरखा
म्हातारी खूप शिव्या देई
झोपताना गादीवरती
कापूस सोडून स्प्रिंग खाई

चेहरे आपले फोडून त्यांनी
सुरकुत्या मोजल्या लाख
कपांमध्ये घेत चहा
वश्यांचाही केला त्याग

चहा पीत पीत पीत
दोघांनीही जीव दिला
कोण म्हणतं ती मेली
कोण म्हणतं हा मेला

## दिवस फाडताना कॅलेंडरवरचा

दिवस फाडताना कॅलेंडरवरचा
सूर्यालाही लिंग फुटते
रात्रीला संवादलेली
गादीवरची मादी आटते

दिवस फाडताना कॅलेंडरवरचा
श्रीकृष्णाचा चकणा डोळा
अर्जुनास हासडतो शिवी
म्हणतो तू तर लई भोळा

दिवस फाडताना कॅलेंडरवरचा
मेंदूमधला प्रिझम फुटतो
पृथ्वीच्या या टकलावरती
सूर्य मग हा रजा ठोकतो

दिवस फाडताना कॅलेंडरवरचा
वर्तमानपत्र गिरकी घेते
नासलेल्या नेत्रामध्ये
'सरकार'नामक रद्दी येते.

## काठी

काठी म्हाताऱ्याची
छानच
आवडते
आवडते
कुत्र्यालाही
उगारली जात नाही तोपर्यंत

काठी
म्हाताऱ्याची
आवडते
आवडते
म्हातारीला
धुणे धुताना उपयोगी पडते म्हणून
उगारली जात नाही तोपर्यंत

काठी
म्हाताऱ्याची
आवडते
आवडते
म्हाताऱ्यालाही
स्वतःच्या हाती असते म्हणून
मुलाकडून हिसकावली जात नाही तोपर्यंत

काठी
छानच
आवडते
म्हातारा
छानच
आवडतो

तरीही काठी काठी असते
म्हातारा म्हातारा असतो

काठी छानच टेन्डीग टुवर्डस इन्फीनीटी

## जाळावं असं

जाळावं असं बरंच काही असतं
कुठल्याही प्रदेशात
मृत घरं मृत वृक्ष मृत ऋतू
कैवल्याच्या श्वासावर उभे असणारे सारे संभोग
आस्वादले तरी
त्यांच्या हातांना गवसत नाही काहीच
ते निराश होतात
पिरॅमीडवर बोलतात
चर्चा करतात
मात्र पिरॅमीड उध्वस्त करण्याची सूचना केली की
ते हसतात
तुमचे पाय धुतात
अलगद तोडतात
आणि तुम्हाला
चौथऱ्यावर उभे करतात

जाळावं असं बरंच काही असतं
कुठल्याही प्रदेशात
मृत घर मृत वृक्ष आणि मृत माणसंही

## मरलीन मन्रो

अभिनेत्री मेली
दारुची अधिक लत लागली
प्रेमभंगाची तार तुटली
एकाकीपणाला उबगली
झोपेच्या जास्त गोळ्या घेऊन झोपली
आणि ती मेली

आता तुम्ही तिला काहीही स्वरूप देऊ शकता

सतत सरणाचा वेध घेणारे तुमचे परंपरावादी डोळे
अलगद मिटून घेतील आपल्या सनातन पापणीत
एक कलावदी चिता

कुंतलाच्या ओलेत्या प्रवाहात शोधाल
तुम्ही अश्रुंचे शुष्क किनारे
पिळून घ्याल पुन्हा एकदा
तुम्हाला परिचीत असलेला मातीचा समुद्र
घालाल पुन्हा एकदा
पिरॅमीडच्या दैवी दरवाज्याला न समजणारा उखाणा
ती काय
किंवा तुम्ही काय
आपण सारेच आपल्या गुणसूत्रातील
अनुवांशिक आत्महत्येचे वाहक
म्हणून तुम्ही तिला नावे ठेवणार नाही

स्मराल फक्त
तिची अभिनयशिल्पे
तिचे नग्नतेत भिजलेले संभोगमुखी अवयव
तिची असलेली नसलेली जलभासीव दुःखे
तिचे कलात्मक सन्मान तिची पारितोषिके
आणि अधिकच उदात्त कराल तुम्ही तिचा मृत्यू
दिवेलागणीच्या वेळी
तुमच्यातीलच एखादा मूर्ख महाकवी लिहीलही
मृत्यूला बिलगून एक दुःखवादी आक्रोशघन महाकाव्य

कुणी कधीही स्मरणार नाही
तिची आत्मविस्मृतीय प्रतारणा
तिने स्वतःच्या दुःखाचे केलेले विकृत लाड
तिचे स्वभोगी व्यभिचार
तिने इतरांना दान केलेल्या मरणकळा
तिने उध्वस्त केलेले स्त्रीपुरुष
तिच्या फसलेल्या अभिनयकळा
आणि स्वतःला कलावंत म्हणून माफ करून
केलेले असंख्य अनैतिक गुन्हे
कुणी काहीही स्मरणार नाही

फक्त
क्षितिजाच्या वाद्यवृदांतील एक वाद्य आत्महत्या करेल

आणि गायकाच्या गळ्यातील सनातन सूर्य
मृत्यूच्या आसाभोवती दुप्पट वेगाने फिरू लागेल

उत्सव साजरा करण्यासाठी
तुम्हाला आणखी काय हवं असतं ?

## पिरॅमीड

॥१॥

माझ्या आयुष्याची कथा उलगडून बसलो की
मला आठवते निनावी वनलेले इस्पितळ
खरा रुग्ण एकच : आत्महत्यावादी
हे ज्या वयात शिकलो ते वय
आजही मला जखम झाली की शब्दातून रक्त येते
आणि इस्पितळाच्या एखाद्या खंडाने कोमात प्रवेश केलेला असतो

॥२॥

कुठलाही पिरॅमीड असतो अहंकाराचा विस्तार
कुठलेही इस्पितळ असते करुणेच्या काळजाची तार
पिरॅमीडने निर्माण केलेले आत्महत्यावादी ग्रंथ मिटवून ठेवता यावेत
म्हणून काय करावे डॉक्टरांनी ?
कुठले आकाश तारावे स्फुंदत जाणाऱ्या तृष्णाच्या ताऱ्यांनी
स्फुंदत जाणारे तारे माझेच पूर्वज आहेत
धुंदीत कोसळणाऱ्या उल्का माझी अपत्ये

॥३॥

वाऱ्याच्या तळहातावरच्या रेषा उचलून
सांगू शकेन मी पृथ्वीचे भविष्य
पण त्यासाठी मला ग्रहांच्या कुंडल्या करायला हव्यात जमा
गतिचे अध्यात्मिक स्तर आणि प्रस्तर उलगडण्यात
दिशांनी घालवली उभी हयात
तरी इस्पितळांना आवश्यक असणारे पेशंट
अद्याप अहंकारातून मिळतात

।।४।।

इस्पितळांना तुम्ही ओळखता ? बाळगता त्यांचे ओळखपत्र त्रासिक ?
मृत्यू हुंगण्याइतपत आहेत तुमचे श्वास अनुवांशिक ?
औषधांचे डोस आणि सलाईनच्या बाटल्या
आणि लांबवर पसरलेल्या खाटा आणि खटल्या
मला आवडत नाही इथल्या आयुष्याचा पांढरा रंग
रक्ताशी चाललेला मृत्यूचा संग
तरीही इथल्या नर्सेसना मी चढवतो पांढराच पोशाष
आणि पहात बसतो दुःखात लगबग करणारी त्यांची शांतता त्यांचा धाक

।।५।।

मला आवडतात
रोगांना आत्महत्या करायला लावणारे संशोधक, त्यांच्या उर्जा त्यांच्या उर्मी
उंदीर माकड वगैरेंचे मानतो उपकारशील आभार मी
औषधांना आत्महत्या करायला लावणारे रोग
तटस्थपणे न्याहाळण्याचा योग
मला साधलेला नाही तरीही
कुठल्याही रुग्णावर माझे हात वादकासारखे फिरतात
त्यांचा कुठलाही अवयव वाद्यासारखा वाजवतात

।।६।।

मी इस्पितळावर बोलतो
तुम्ही पिरॅमीडवर
मला मिळणारे सारे रुग्ण तेथूनच येतात
दुर्बिणीतून नीट पाहिलं
की स्पष्ट दिसतं पिरॅमीडचं नग्न अंग त्यावरची रेती
कितीही वस्त्रे सोलली तरी त्याची नग्नता लागत नाही हाती
तो माझ्यासमोर उभा ठाकलेला असतो माझ्या इस्पितळाची करण्यासाठी माती
न जुमानता नाती
योद्धासारखा
तो करत नाही गर्जना फुंकत नाही शंख
फक्त त्याच्या धनुष्याचा टणत्कार घुमला की

माझ्या इस्पितळात दाखल होतो एक रुग्ण
त्याच्या अवयवांचे मोडलेले पंख

॥७॥

मला माहीत आहे
माझ्या इस्पितळाची मर्यादित शक्ती
आणि पिरॅमीडमधून होणारी मृत्यूची अमर्याद अभिव्यक्ती
तरीही मी सोडत नाही माझे इस्पितळ
पिरॅमीडच्या डाव्या बाजूला आहे समुद्र खाऱ्या पाण्याचा तळ
उजव्या बाजूला वाळवंट गोड्या पाण्याचे मृगजळ
मेघांच्या जोरावर तो फळतो
वाळवंटाच्या दाबाबरोबर तो वाळतो
त्याच्या दोन्ही डोळ्यात असतात अणुबॉंब
दोन्ही नाकपुड्यात व्हायरस
पिरॅमीड आणि इस्पितळ
आकाशाला दोघांपैकी कोणीच नाही स्पर्शत
तरीही आभाळाला भिडलेले असतात
त्यांच्या मस्तकातून उगवलेले ध्वज

*

# ८. गाथा

## सुरवात

मी पूर्ण जाणतो की हे विश्व निष्पाप आहे
पण मी विश्व नाही विश्वाचा भाग आहे
आणि
इथूनच माझ्या यातनेची खरीखुरी सुरवात आहे

## तुम्हाला

तुम्हाला सावल्या नष्ट करायच्यात ?
शांतपणे अंधारात शिरा
सावल्या आपोआप नष्ट होतील

तुम्हाला कविता नष्ट करायच्यात ?
शांतपणे शब्दात शिरा
कविता आपोआप नष्ट होतील

## मित्रा

कवितेच्या उत्कट देहात
पाऊल ठेवताना
ए मित्रा, जरा थांब
तुझ्या ओलेत्या डोळ्यांनी
एक वाढव महाओळख
सोड शब्दाच्या काळजात
तुझ्या देहातील गोळा करून रक्तातील काळोख

कदाचित मगच जाणवतील तुला
कवितेतील वैश्विक संदर्भ त्यांचे जाळे
उमजतील भाषेतील गर्भार शब्दांना
आत्मसाक्षात्काराचे लागलेले डोहाळे

मित्रा, जरा निरखून पहा

हा अग्नी
हे पाणी
हा वायू

ही पृथ्वी
आणि हे शून्य

त्यांना साद देशील तर
छोट्याश्या बीजातून ते पुटपुटतील अरण्याची वर्णमाला व्यंजने आणि स्वर
उठतील जन्माचे गाणे गात मृत्यूची अंगाई म्हणून दाखवशील तर

हा अग्नी
हा वाढतो युद्धभूमीच्या पाळण्यात
युद्धशास्त्राचे सारे ज्ञात अज्ञात नियम ह्याला आहेत ज्ञात
ज्ञात आहे ह्याला
शस्त्रांच्या ठिणग्यातून उडणारे अटळ वध शह आणि मात
अस्त्रांच्या आरंभस्थानातील
साऱ्या आत्महत्या हा तुला म्हणून दाखवेल
हाताळून दाखवेल फुप्फुसांच्या भात्यातले
श्वासांचे मृत्युंजयी बाण
उधळून दाखवेल सारे जीव त्यांचे तणाव त्यांचे ताण
जाळून दाखवेल विश्वापुढे ईश्वर
आणि ईश्वरापुढे विश्व
वैश्विक चक्रव्यूहाच्या साऱ्या दरवाज्यांची नावे
ह्याला आहेत ज्ञात
मात्र जीवनाच्या सर्वच खिडक्यांची लांबीरुंदी
ह्याला सांगता येईलच असे नाही
हाडांची प्यादी करून
त्यांच्या खेळ्या
आयुष्याच्या दोन्ही बाजूंनी करण्यात हा निपुण
हा निपुण नेसवण्यात
कवितेला कविची चिता सगुण
ह्याने पुरवेलल्या उर्जेमुळे आहे
शब्दांचा रंग पिवळा
तरीही ह्याला झेपत नाही मुक्तीचा आत्मसोहळा
म्हणूनच काही विचारशल
तर हा फक्त म्हणेल
कवितेच्या देहाची ही पहिली ओळख आहे

हे पाणी
काळाच्या पोटातून बाहेर उडाले की

स्वतःचा सारा गर्भार प्रवास
आपल्या पायात उचलून घेत हिंडेल अवकाशभर
आणि मातीच्या अंतःकरणावरून
फिरवेल पावसाचा वर
विचारशील काय झालं
तर हे म्हणेल
कवितेच्या देहाची ही दुसरी ओळख आहे

हा वायू
गतीची विलक्षण आवड ह्याला बिलगली तेव्हा
स्वतःच्या जिभेवर ह्याने ठेवला होता एक पदार्थ
आणि प्रश्न विचारला होता सार्थ
सांत कि अनंत
आणि उत्तर मिळेपर्यंत हे अवतरले होते
सृष्टीच्या विविध लिलात बनून पार्थ
ह्याला ऐकवशील कुठलीही अंगाई तर
सृष्टीचा पान्हा पिळून काढेल धारोष्ण दूध
आणि शब्दांना ते पाजून
जाऊन बसेल निवांत भाषेवर जाळीत व्याकरणाचा ऊद
ह्याला काही विचारशील
तर म्हणेल
कवितेच्या देहाची ही तिसरी ओळख आहे

ही पृथ्वी
हीला जरा गर्भाशयातून बोलवावे लागेल
पृथ्वी पृथ्वी बाहेर ये आले आहे तुझे माहेर ये
हा मंत्र उच्चारलास की ती फडफडवेल तुझ्या काळजात
लाखो वर्षे तपश्चर्या करून प्राप्त केलेले तिचे अवाढव्य हात
संपूर्ण मातीपासून बनलेली तिची एकमेव काया
कुठल्याही अनंताला वेसण घालून
त्याची करेल माया
आणि शांतपणे त्या मायेच्या घड्यातून भरून घेत शब्द पायघोळ
घालेल तुला काही दुर्बोध दंतकथांची आंघोळ
काही विचारशील तर ही म्हणेल
कवितेच्या देहाची ही चौथी ओळख आहे

आणि हे शून्य
दिसणार नाही तुला फक्त जाणवेल

विश्वाचे जैविक गुणधर्म प्रसवणाऱ्या वेल
ह्याच्या अंगी आहेत की नाहीत
मलाही नाही माहीत
तुझ्या देहातल्या मंद रक्तवाहिन्यातून
हे हिंडेल तर तुला दिसतील
कोट्यावधी हृदयं करुणेच्या प्रकाशात उजळताना
बुद्धाचे उदय सळसळताना
ह्याला काहीही कितीही वेळा विचारलस
तरी हे बोलणार नाही काहीच
ही असेल कवितेच्या देहाची अंतिम ओळख
मात्र आपण ह्याच्या आत खेचले जात आहोत
अनुभवत गुरुत्वाकर्षणाचा काळोख
असे तुला वाटले तर तर मला नको देऊ दोष
कारण
मृत्यू आणि सृजन
जेव्हा एकमेकाला भेटतात सगुण आणि सदोष
तेव्हाच कविता जन्मत असते
करीत जन्माच्या उत्सवाचा परिपोष
तेव्हा ए मित्रा
कवितेच्या उत्कट देहात उतरण्याआधी
कर विचार
आणि मगच आपले ओलेते डोळे फिरव
महाशब्दांच्या त्वचेवरून साकार
अन्यथा
कवितेने मोकळेच ठेवलेत तुझेमार्ग विनातक्रार
तू जाऊ शकतोस.

## माठ

आयुष्याचाच चिखल तुडवला
माठ बनवले आयुष्याचेच
आयुष्यालाच विकत दिले
मोल मिळाले आयुष्याचेच

वेळ मरणाची जेव्हा झाली
तेव्हाही कवटी नाहीच फुटली
फक्त एक आवाज झाला
आणि एक माठच फुटला

## अखेरचे प्रेमगीत

(आत्महत्या ही माणसाने स्वतःला केलेली शेवटची मदत असते)

तू उद्यापासून परकी होत जाणार
खरं वाटत नाही

तळहातावरील प्रीतीच्या भाग्यरेषा
प्रेयसीनेच खुडून घेतल्या की विरघळत जाता
देहाची पावले मृत्यूत ढेकळासारखी
अस्तित्वाच्या अद्वैती लिलेमधून पारखी
प्रेम होऊ लागले गायब
की आत्महत्येनंतरच्या द्वैती आसमंतात जमा होऊ लागतात
काही कविता आपोआप

आजची रात्र ही अखेरची रात्र

प्रेमाची गाथा पाण्यात बुडल्यानंतरही
तरंगून वर आलेल्या माझ्या काही कविता
रडत रडत पोहचतील उद्या तुझ्या अंगणात
आणि त्यावेळी मी घोषित करून स्वतःला अनामिक
शांतपणे गायब झालेलो असेन विझवीत एकेक वात

तू उद्यापासून परकी होत जाणार
खरं वाटत नाही

दुःखाच्या वार्ता असतात नेहमीच श्वासाच्या अंतरावर
आणि तरीही आपणाला नसते त्यांची खबर
तुझा एक निनावी श्वास
माझ्या श्वासाला सांगून गेला हे सत्य तेव्हा
आठवणीच्या अंगावरून हात फिरवणारे माझे काळीज
पडले मृत्यूमुखी
धडपडले माझे हात दुःखी
तुझ्या स्पर्शाचा आधार शोधायला
आज रात्री हातच का सारा देहच देईल नाहीसा
आणि उद्याचा सूर्य तुझ्या अंगणात पोहचण्यापूर्वीच
मी एका अफवेत जमा झालेलो असेन कसाबसा

तू उद्यापासून कुणा परक्याची होणार
खरंच खरं वाटत नाही

दुःखाच्या मिटलेल्या कमळातील
सारेच बुद्ध घेऊन
मी तुला प्रथम भेटलो तेव्हा
तू तुझ्या क्रूसाने
झाडत होतीस आयुष्याचे अंगण
आत्ताच माझ्या खोलीत येऊन गेला तो क्षण
आणि समोर टांगलेला फास बघून
सुरी खुपसून मरून गेला त्याचा एक एक कण

मला असलेला मृत्यूचा शाश्वत ध्यास
तू जाणतेस
तरीही माझ्या मृत्यूनंतर जीवनापाशी अडलेल्या काही कविता
पोहचतील तुझ्यापर्यंत
आणि प्रश्नांचा कटोरा हाती घेऊन
तुझ्या दारात भिक्षा भागत रडत राहतील शब्दांचे संत
माझे अंत
तू त्यांना काय सांगणार आहेस
काय सांगू शकशील तू त्यांना
वासनांच्या पाशवी घरात
पाळणे जोजवत हिंडणाऱ्या
आदिस्मृतीला, आदिगतिला
आदिसंभोगाला, आदिमातेला
आदिदेहाला, आदिपुण्याला
तू कश्याने देशील सांत्वन
जाऊ दे जवळ येत चाललाय
फुलपाखरांचा मृत्यू होण्याचा क्षण
आता कोणत्याही क्षणी तू करू लागशील शृंगार
रक्ताचे व्याकरण तुला कधी कळालेच नाही आरपार
मलाही हाडांच्या रचना जुळवताना त्रासच झाला धारदार
खरंतर हा क्षण
तू ढकलायला हवा होतास फार पूर्वी
पण तुला आवडते आयुष्याच्या अनोळखी रणभूमीवर
जोमाने लढणाऱ्या पुरुषांनी
प्रेमात मात्र हतबल होऊन केलेली आत्महत्या हिरवी
म्हणून तू बोलली नाहीस ठेवलीस बेसावध
असा करण्यासाठी माझा मुलायम वध

माझ्याजवळ आहे एक आयुष्य
एक धनुष्य
माझ्या आयुष्याच्या पाठशाळेत
आत्महत्येसारखे विषय मी शिकलोय लहानपणापासून
आता कोणत्याही क्षणी मी मोडेन धनुष्य
तोडेन आयुष्य
माझ्यासाठी फक्त एक कर
मृत्यूपाशी अडलेल्या माझ्या काही वाळूच्या कविता
तुझ्या अंगणात येतील रांगत रांगत
त्यांना ढकलून दे शांतपणे पाण्यात
आणि त्या नाहीश्या होईपर्यंत पश्चात्ताप कर गाण्यात
स्वतःसाठी माझ्यासाठी
त्यांना शांती मिळवून देण्याचा तोच एक उपाय
तोच एक न्याय
तेव्हा उचल तुझी कर्णफुले डुलव कानात आत्मनाशाचा विस्तव
आणि पसर एकदाचे कपाळभर कुंकू
करून टाक एकदाचा सौभाग्यवती रक्तोत्सव
नष्ट कर, नष्ट कर, नष्ट कर
स्वतःला आणि मलाही.

## सूर्य मावळला की

सूर्य मावळला की तुम्ही म्हणता रात्र झाली
मी म्हणतो चला चांदण्यात हिंडण्याची वेळ झाली

शक्य आहे की
जखमात आढळणाऱ्या रक्तवर्णी मन्दिरात
तुम्ही जे देव पाहिले ते मातीचे पाहिले
आणि मी ते पाहिलेले नाहीत
शक्य आहे की
रक्ताच्या थेंबात जन्मणाऱ्या सर्व मुलांना
तुम्ही जो जन्म दिला
तो मृतावस्थेत दिला
आणि मी तो दिलेला नाही
शक्य आहे की
कण्ठाच्या वाळवंटात तुम्ही जे पाणी प्यालात
ते मृगजळाप्रमाणे प्यालात

आणि मी ते प्यालेलो नाही
तरीही
जेव्हा तुमची जलस्थळे आणि मयसभा
माझ्या घरी येऊन
सूर्य घेऊन निघून जातात
तेव्हा मी मनमुराद मनमोकळा हसतो

सूर्य मावळला की तुम्ही म्हणता
अंधार झाला
मी म्हणतो
पृथ्वीने स्वत:भोवती फिरण्याचा नियम रीतसर पाळला.

## बदल

सारंच काही बदलत असतं
किंवा काहीच बदलत नाही
किंवा तेच बदलतं जे बदलत नाही
किंवा बदलण्यासाठी ते तेच रहाणं आवश्यक असतं

उदाहरणार्थ
पूर्वजांनी दिलेला हा कावळा
मी म्हणतो ठामपणे
हा बदलू शकतो
बदलू शकतो ह्याचा गळा
ह्याच्या आकाराची कळा
ह्याच्या रंगाच्या झळा
आणि झपाट्याने बदलतो त्याला चिमणीत
वाटतं
झाला बदल
पण चिमणी ओरडते अचानक
म्हणते
मलाही आहे चोच कावळ्याप्रमाणेच
मलाही आहेत पंख कावळ्याप्रमाणे
मी ओरडतो संतापाने गोळा करून अवघा घाव
पण शब्दाऐवजी बाहेर पडते तोण्डातून काव काव

सारंच काही बदलत असतं

किंवा काहीच बदलत नाही
किंवा तेच बदलतं जे बदलत नाही
किंवा बदलण्यासाठी ते तेच रहाणं आवश्यक असतं.

## शिक्षक

मी निसर्गाकडून
काहीच नाही शिकलो नवे किंवा जून

शिकलो नाही आकाशाकडून शून्याची स्तब्धता
घेतली नाही जमिनीकडून खनिज्यांची घट्टता
शिकलो नाही झाडाकडून हिरवेगार होण्याची झील
आत्मसात नाही केले पावसाकडून
कोसळूनही ब्रह्मचारी राहण्याचे स्पिरीच्युअल स्किल

मी फक्त उंडारत राहिलो निसर्गात
उनाड विद्यार्थ्यासारखा बाहेर आणि आत
आता सर्वत्र निसर्ग शिक्षकासारखा उभा
मुक्तिच्या शाळेत मला फेल करण्याच्या मूडमध्ये अनंतात
आणि मी निदान कवितेतून तरी एटीकेटी मिळवून
पुढील इयत्तेत सरकण्याच्या प्रयत्नात

## विठू

विठू माझी आई
देते मजला वाणी
स्तनामधून काळ्या
पाजे शुभ्र गाणी

विठू माझा पिता
भूमीतून काढतो पाणी
अन्नासाठी आणतो
मातीमधून नाणी

विठू माझा बंधू
शांतीचे खेळ खेळतो
माझ्या जात्याभवती
घेऊन शमी फिरतो

विठू माझी वहिनी
युद्धात दिवस काढते
विधवा ईव्हहातांनी
ताटात फळ वाढते

विठू माझा पुत्र
निर्वाण घेऊन चालतो
देहामध्ये माझ्या
बुद्धाचे वस्त्र बदलतो

## मागणे

पारध करण्यासाठी
पारधी जसा धावावा
तुझा हा सावळा देह
मागे तसाच रहावा

चरणावरती तुझ्या
फुलावे कमळ माझे
जिवंत व्हावेत चन्द्र
हे पिऊनी सूर्य ताजे

व्हावी प्रकाशशिंपण
माझिया डोळ्यावरती
माझा व्हावा जन्म नष्ट
तुझ्याच विटेवरती

## किती बदलू मी काचोळ्या

अवकाश असतो तसाच
काळात तीच उदासी
तुला शोधता शोधता
झालो मी इथे वनवासी

माझ्याभोवती तुझ्याच
वाऱ्याचा काळा भोवरा
पहाण्यासाठी तुला
किती उसवू माझा चेहरा

गर्भातच हालला जन्म
तुझा तिथे लागला ध्यास
छातीवरती माझ्या
स्तनांचा उगवला भास

मातृत्व नाही कपाळी
जगण्याच्या केवळ ओव्या
मला वक्ष फुटावे म्हणून
किती बदलू मी काचोळ्या

## मी थकून गेलो पुरता

मी थकून गेलो पुरता
ही कसली तुझी करणी
मी टीचभर पाण्यासाठी
करू किती तुझी मनधरणी

तुझीच लुगडी फेडून
जर भीमा हिरवी वहाते
मी झोळी पसरतो तेव्हा
का पाणी भगवे होते

## बण्ड

तुझा अवकाशही सापेक्ष
मी जन्म तिथून उठवला
काळाने ढकलता सूर्य
मी माझा देह पेटवला

तू नकोस माझ्यासमोर
तुझे आणू विश्व अखण्ड
मी तुकडे वेचित वेचित
मांडतो हे माझे बण्ड

हास्यास्पद माझी करुणा
तरी उरात तिच्या माया
जी काया जीर्ण भेटते
तिच्यावर ढाळते छाया

मला जाणतो हात दोन
अन् तुजला अनंतखिडक्या
मी अस्तित्वाला देतो
म्हणूनीचाली दुडक्या

मी नाही देत आव्हान
जातो तुला निमूट शरण
तू मरतो म्हटलास तरी
नसतोस पावणार मरण

इतके समाधान पुरते
जे करते मजला अखण्ड
मी तुकडे तुकडे वेचित
मांडतो हे माझ बण्ड

## भक्ति

मज सारे कळत चालले
तरी कळत नाही काही
हंबरतोस तर मग का तू
पाठवत नाहीस गाई

मी हिंडतो आहे व्याकुळ
अनवाणी उरात यक्ष
पाजण्यापुरते उत्तर
तू काढ बाहेर वक्ष

तू माझी जर माऊली
कर माझा तू प्रतिपाळ
गाडली मी काया तरी
मातीत उगवते नाळ

भक्तीचा होतो मृत्यू
संशय देहात उतरतो
भाग्यावरती माझ्या
विधवेचे कपाळ पसरतो

मातृत्वाची आता तरी
तुझ्या बदलून टाक चाल
माझे पिऊन रक्त बघ
भक्ती होते आहे लाल

## पौर्णिमा

वीटेवर तू आयुष्य
चन्द्रभागा पुरामध्ये
वाढ ही विधवा माझी
तुझ्या कटी उरामध्ये

डोळ्यातले चन्द्र त्यांना
दिसला ना कधी डोळा
झाली नाही पाण्यातून
पौर्णिमाही कधी गोळा

तू नुसता मुखस्तंभ
घालवली माझी कळा
लागला ह्या आयुष्याला
बुडण्याचा मन्द लळा

एक दिस बुडताना
तुलाच मी बुडवेन
तुझ्या काळ्या हातातून
पौर्णिमा मी सोडवेन

## निरोप

वारकऱ्यांनो चलतो
ठेवून मागे झाडे
देहाची माझ्या करा
बन्द सारी कवाडे

त्या काळ्याची मांडणी
नाही वाचता आली
क्षमा मागतो माझी
भाषा आहे बोली

सांभाळा ही गाणी
उमजून तुमचा प्राण
फोडून जन्म माझा
भरले मी ज्यात त्राण

काळ्याला त्या कळवा
घेऊन गेला वारा
अन् दरी दिसेल तेथे
मृत्यू हा माझा भरा

## केशवा

उठवू नको केशवा असण्याची तुझी हूल
आयुष्य जाळले तरी आली ना तुझी चाहूल

जगवले सारे जन्म तुझाच भास खोवून
केले गोळा पाणी गाणी गाऊन गाऊन

माझ्या हरेक देहात अंधार बांधलेला
मृत्यूच्या मत्त शिळांनी काळोख सांधलेला

चंद्रभागेत हलते तुक्याची कोरडी झाक
गाण्यात होते गोळा सृजनाची मृत हाक

गवसत नाही मजला अस्तित्वाचा उत्सव
तुझी वीट भाजेल असा शोधतो मी विस्तव

किती काळ हा गळणार टिंब टिंब काळोख
मलाच नाही गवसत माझी अस्सल ओळख

घेऊन येतो मृत्यू ओळीने भगव्या ओळी
हाती देतो माझ्या मरणाची मजबूत झोळी

झोळीस असते तुझी छाया लगडलेली
शब्दामध्ये माझ्या सावित्री पहुडलेली

## वीष

विठ्ठला तू नको आठवू ती माझी तुझी कहाणी
गाथेतून आता उरली जगण्याची जळकी गाणी

पंढरपुरी जी उरली ती केवळ तुझीच काया
ही माझी भक्ती म्हणजे डोळ्यांची काजळमाया

मी तोडली माझी नाळ तू गाऊ नको अंगाई
मी शोधतो जेव्हा बाप तेव्हा गमावतो आई

तू मृत्यूशय्येवरती दाखवू नकोस आमीष
दंतकथेतून सत्यास अफवेने घातले वीष

## तुला कश्याचे

नको विठ्ठला सांगू मजला गाण्याचे तुझे वेड
गतजन्माचे पाप आढळते पुण्यही होते जड

तुझाच कैदी करून बण्ड उसवेन पंढरपूर
ह्या बण्डाला म्हणूनी थंड जाऊ नको ना दूर

ओठ दिले तू शब्दही तुझे गाणे हे माझे नव्हे
मृग नसेल तर मृगजळ माझ्या थोट्या भक्तिस हवे

नकोस येऊ पाण्यासाठी मजकडे तू केशवा
मीही कैदी तूही कैदी जन्म ही एक अफवा

दूर उभा तू दूर रहा रे गाणे नको ना गाऊ
म्हणतील शब्द दिसता गाणे तुरुंगात का राहू ?

शब्द उडताच दिशा उजळते तसाच राहतो पाय
शरीर मरता शरीर जन्मते तुला कश्याचे काय ?

## संचित

माझ्याकडे पाहूनी असा क्रोधित नको होऊस
मी वाळलो कारण तूच धाडला नाहीस पाऊस

मी किती विनवण्या केल्या विटेवर ठेवला माथा
वाळूत बुडाली ती कधी वर न आली गाथा

मी शोधित गेलो तुझ्या प्रत्येक पायरीत झरे
माझी पिळवट पाहून तुला कधी न भरले कापरे

तू दगडासारखा राहिलास उभा घेऊनी नदी
मी पाठ वळवली तर तूच निघालास गारदी

आता कश्यास आणतोस डोळ्यात तुझ्या पाणी
माझी भक्ती म्हणजे तुला वाटली हलकी गाणी

नको सांगू काही मजला मी जीव देणार पाण्यात
करणार काही असशील तर जीव भर ह्या गाण्यात

मरताना निवांत मरेन लोक म्हणतील तुला खुनी
मृत्यूनंतर माझ्या तुला मैफल वाटेल सुनी

भक्तीस माझ्या तुझे एवढेच दर्शन तारेल
पुढील जन्मास माझ्या एवढे संचित पुरेल

## नाच

नको आणू माझ्यासमोर
तुझी काळी काळी काया
तुला शोधता शोधता
माझा जन्म गेला वाया

नाशाची अटळ गाथा
हे जगणे म्हणजे राख
चुलीत जळाला जन्म
तरी नाही दिलीस हाक

आता कशास आलास
मी केव्हाच केली पाठ
भक्तीला नसते लांबी
भक्ताला नसतो काठ

जा घेऊन तुझी काया
तुझी मुक्ती म्हणजे लाच
तुझा देह अनंत तरी
तुझा विटेपुरताच नाच

## की तूही

तू दाखव आता सूर्य
किती वेचू मी कवडसे
तुझ्या काळ्या अंगावरती
आपटून फुटले आरसे

अंगमस्ती तुझ्या विटेची
मी विणली बांधकामास

मी फिरलो घराभोवती
तरीही न गवसला आस

पाण्यातून येते पाणी
ही भीमा पुढे सरकते
काळाला फुटती हात
मन्दीर जुनेच गिरवते

दे तूच चिमूटभर उजेड
आयुष्य ठेवेन तारण
येण्यासाठी तुझ्याकडे
का द्यावे लागते कारण

कसला तू विठोबा मग
की केवळ दगडी बन्दीश
असशील तू द्वारकाधीश
तर चल इथून तू निघ

मला नको केवळ स्वामी
ज्याचे काळीज काळा दगड
की ईश्वर बनण्याआधी
तूही होतास माकड ?

## विठू - २

कोठून आला विठू
अज्ञात आहे सत्य
पहात बसावी त्याची
भक्तांनी फक्त गस्त

विठूचा शुभ्र पैस
भक्तावर धुके पसरतो
हिंडताना देहामधून
मायेच्या शाळा भरवतो

लिलांचा खेळ खेळण्या
विठू नग्न उतरतो
भक्ताच्या बेंबीमध्ये
उन्हासारखा झरतो

विठूला काय कश्याचे
भक्तात दीप उजळतो
अंगावरती विठू
संभोग नवा उगळतो

सण म्हणा वा तुम्ही
म्हणा विठूचा उत्सव
भक्तांच्या मूळामध्ये
विठूचा ओला विस्तव

भक्त येवो न येवो
विठू विठूच रहातो
भक्ताच्या देहामधून
फळे गोमटी काढतो

जो भक्त होतो तो
विठूला देतो फळे
भक्ताच्या पोटात मात्र
ओरडती कावळे

विठू सजीव म्हणून
भक्त सजीव मरती
रडत नाही विठू
भक्तांच्या अस्थीवरती

## मी मरण नेसून उभा

मी मरण नेसून उभा
माझा पुढील जन्म सांग
असणार तिथे का अशीच
शब्दांची अनावर रांग

फुटेल का अशीच पहाट
भाषेचा नेसून डोळा
शब्द ढवळता होईल
पृथ्वी का अवघी गोळा

फुटतील का त्या जन्मास
कवितेची हिरवी पाने

होईल का पिसता त्वचा
जगण्याच्या त्यांचे गाणे

मी मरण नेसून उभा
माझा पुढील जन्म सांग
असणार तिथे का अशी
शब्दांची अनावर रांग

## जिझस

हा अंत किती सामान्य
हे जगणे किती साधे
तू जगत गेलास थेंबभर
पाण्याचे करूनी वादे

चल पड कायेच्या बाहेर
जगण्याचा पालटून चेहरा
देहात तुझ्या रे कधीच
अवतरल्या नव्हत्या मोहरा

अर्थाचे उठले वादळ
शब्दांचे उघडता ओठ
तू इथे जन्मलास तेव्हा
तुजलाही होते पोट

तरीही भोगलास प्रश्न
जगलास प्रत्येक उत्तर
उरी शून्य जन्मले तेव्हा
उजळलेस सर्व चराचर

पण तुझ्यापुरतेच होते
तुझ्या प्रश्नांचे उत्तर
तू वाटित गेलास फुले
जी बनतील केवळ अत्तर

मरणाची झाली वेळ
चल ओढ तुझा तू क्रूस
जिच्या पोटी आलास तिचीच
मातीची होती कूस

# नदी

॥१॥

नदीच्या अलिकडे की पलिकडे
हाच खरा प्रश्न आहे

अलिकडे आहे माझा मायेसहित पुनर्जन्म
पलिकडे आहे माझी ईश्वरासमवेत मुक्ती

लाटांनो,
आता मी माझे प्राक्तन कोणास नेसवू
तळहातावर विश्व वाढवत
कपाळावर परमेश्वर उमलण्याची प्रतिक्षा करत
स्वतःस कुठवर उसवू ?

अवकाश तर चोहीकडून दाटून आलाय

मुक्तीच्या सर्व शक्यता नोंद करून
झोपी गेलय कपाळात भाळ
तळफुप्फुसातील साऱ्या श्वासांनी
जोडून घेतलीये मुक्तीशी त्यांची नाळ

नदीच्या अलिकडे की पलिकडे
हाच एक प्रश्न आहे

॥२॥

सखये
विस्तवाच्या धारदार सूरीने
साफ करून घे वास्तव
पांढरे कर हे ज्ञान
            हे दुःख
पांढरी कर ही तृष्णा
            ही स्मृति
पांढऱ्या कर ह्या चिंता
            ही चिंतने
आणि कपाळाची घडी घालून
शांतपणे सोडून दे माझे प्राक्तन

ह्या पाण्यात
कदाचित मगच
विश्वास ठेवेल माझ्यावर परमेश्वर
करेल क्षमा तुझ्या माझ्या संभोगाला
तुझ्या माझ्या तृष्णेला

सखये
कपाळाची घडी घालून
शांतपणे निरोप दे

नदीच्या अलिकडे की पलिकडे
हा प्रश्न फक्त माझ्यापुरताच आहे.

॥३॥

लाटांनो
कुठून गोळा होतात ह्या तृष्णांच्या नावा
कुठल्या किनाऱ्यावर त्या उगवतात
कुठल्या किनाऱ्यावर त्या मावळतात
त्यांच्या अंगात वादळ टोचून टोचून
त्यांचे हालाहाल केले तरी
कशा काय तगतात त्यांच्या काया
कशी फुटतात त्यांना वल्ही
कशी पसरतात पाण्यात आपली माया

लाटांनो
आणू नका आणू नका हे तृष्णांचे घस
आजतर माझ्या मुक्तिचा आनंद दिवस
तुमच्या तृष्णांचा अकारण मला मोह घालू नका
लाटांनो
तुम्ही फक्त पाणी आहा पाण्यासारख्या रहा
नदीसारख्या वहा आणि वहातच रहा

॥४॥

हे कसलं निर्णयस्वातंत्र्य आहे
माहीत नाही मला
निवडीला असतो वास नेहमीच मर्यादांचा

आणि प्रत्येक पर्यायात होते
इतर पर्यायांची शिळा
आता मायेचा वध करून
परमेश्वर माझ्यात त्याचे हातपाय पसरेल
उगवेल आमच्या मिठीतून
मृत्यूचे हिरवेगार पीक
फुटेल आमच्या संभोगाला
माया नाहीशी करणारी प्रार्थना
आणि शून्याचा निर्गुण स्वभाव स्वीकारून
मी विरघळत जाईन परमेश्वरात

नदीच्या अलिकडे की पलिकडे
हा एक केवळ प्रश्न आहे.

## बुद्धांनो

बुद्धांनो कुठून मिळती
आकार तुम्हास गहिरे
ओंजळीत येत नाहीत
तुमचे अद्भूत चेहरे

तुम्हास आकाशडोळा
तुमची ही मातीनिष्ठा
माझाही तुम्ही करा ना
हा देह जरासा उष्टा

माझीही जावोत सर्व
सूर्याने बोटे उजळून
अंगठ्यांना ह्या फुटू दे
अर्थांचे तुमच्याच उन्ह

माझ्या ह्या आयुष्याने
प्रकाश तुमचाच प्यावा
मरताना माझा देह
मातीत तुमच्या मिळावा

## बोलणे

ह्या बुद्धाशी बोलू दे
मला संपवताना जगणे
कोठून पुन्हा मिळणार
असण्याचे असले हसणे

उत्तरे सारी संपलीत
उरलेत ते केवळ प्रश्न
ह्या बुद्धांशी बोलू दे
होताना असणे मग्न

नको लावून घेऊ खिडकी
दारास नाही आधार
हा बुद्ध हसतो तेव्हा
नाहीसा होतो अंधार

होतात वादळी भूकंप
देहाचा वाजतो ढोल
बघ कसा एकटक हसतो
त्याच्याशी तूही बोल

नको वाकूस तशीच रहा
नको शोधू सखे मात्रा
मी जगत होतो तेव्हाच
मृत्यूंच्या आटपल्या यात्रा

ये आत जरासा बुद्धा
ओठावर माळून हसणे
मरताना मला कळू दे
मी नव्हतोच माझे नसणे

## मृत्यूनंतर

मृत्यूनंतर माझे होतील रंग गहिरे
ठेवून जातील मुद्रा माझे रंगीत चेहरे

उगवेल सूर्य तेव्हा शब्द माझा उजळेल
अंगणामध्ये तुमच्या कविता घेऊन उतरेल

करुणा कवितेमधली माथी तुमच्या उमटेल
अशक्त तुमच्या देही मृत्यू माझा भटकेल

मनात दाटेल दुःख नका करू तुम्ही खंत
कवितेत वारतो जो त्याचाच होतो संत

अश्रुसोबत तुमच्या असू द्या माझे पाणी
उगवतील ही माझीच थांबाल तिथे गाणी

## कविता

कविता मोडू कशाला
ती तर नक्षत्रांचे देणे
तुम्ही म्हणता ज्यास उखाणा
ते असते माझे गाणे

जगण्याला नसतो साचा
गतीला नसतो नाश
त्वचा सोलतो त्यालाच
सृजनाचा उमगतो वास

तुम्ही जगा फुलांच्या खुशाल
भरवून कागदी शाळा
कविता माझी हिंडते
पायाला बांधून ज्वाळा

मी असाच निरंतर जगेन
कवितेचे फेडीत दाणे
तुम्ही म्हणाल ज्यास उखाणा
मी शोधित त्यातच गाणे

## तो

तो असा कसा ग जगला
शापांची कसीत जमीन
की सत्य शोधणाऱ्यांना
स्वप्नांची अटळच वीण

कशी आली सहजच त्याला
जन्माची समग्र जाण
की जन्मतःच तारेवेधक
मातीचे पेलती बाण

तळहाती दैवी नांगर
मागती शब्द भवती भीक
मृगजळातून अलगद त्याने
मेघांचे काढले पीक

त्यास कुठून मिळाले हात
आत कसला अजब सागर
हुंदक्यात आता उरली
दंतकथेची दैवी घागर

## आवाज

हे सगळेच नष्ट होईल
तू गाऊ नकोस कविता
अर्थास न कळते कधी
शब्दांची जाते वाचा

तू कधी शोधशील मुळे
जगणे केवळ बोभाटा
मातीवर चढते माती
सृजनाचा इतुकाच वाटा

अवकाश केवळ आहे
काळ केवळ एक वाद्य
जे गाऊ पहात होतास
ते कधी न झाले साध्य

तू गाऊ नकोस कविता
तुटणारच शेवटी साज
शब्दातून येतो आहे
कवटीचा वध आवाज

## मागणे -२

दाटून यावेत मेघ
जन्म जन्म जन्मावा
क्षितिज हलवून माझा
सूर्य मी जमवावा

गर्भार व्हावी माती
खोंडाचे व्हावेत बैल
घुण्यासाठी धरती
मेघही व्हावेत सैल

बहरून जावे गाव
आनंद सभोवताली
पाण्याने धरित्रीची
मोजावी ह्या खोली

पाऊस व्हावा सुफळ
मातीस दिवस जावेत
गर्भात ठेवून धून
शब्दांनी हळूच उठावे

## पाणी

कविता जे जगले त्यांचे
मृत्यूही महान होते
ही माझी तृष्णा छोटी
हे शब्दहि माझे कोते

नातेही नसते माझे
सत्याशी काहीच तसे
भाषेस ओवतो भाषा
शब्दांचे घालित टाके

एवढेच देणे आता
देतात मला ही गाणी
ही नदी आटता भूमीत
माझ्यात हालते पाणी

## सत

शून्याचे मागत आशिष
इथे जगतो विनाशवंत
आटत जातो देहात
तृष्णांचा करीत अंत

मी म्हणून पाहून विनाश
कधी बनत नाही क्रोधी
जो आटत जातो देहात
इथे तोच होतो बोधी

घेऊन ये भिक्षुका
तू निळे सावळे डोळे
मृत्यू नेसशील तेव्हा
जन्माचे कळतिल सोहळे

दोघेही जाऊ पार
तृष्णांचे करीत अंत
अरे स्वप्न वारते ज्याचे
इथे तोच होतो संत

## यात्रा

तीथेच आलास पुन्हा
होतास जिथुन तू गेला
ही यात्रा चालली कुठे
देहात तुझ्या कोण मेला

देह नव्हेत हे केवळ
स्वर्गाचे क्षीण दिलासे
तू बिलगशील जर तुयांना
जन्माचे टाकतील फासे

देहांना तू भुलणार का
स्वप्नांना जाणार शरण ?
अस्तित्व उजाडले तरी
तू नाही पावणार मरण

चल सोड तुझी ही काया
वासनांचा फेकून शेला
जन्मला जो देही तुझ्या
देह सोडून केव्हाच गेला

## दिलासा

मृत्यूच्या मोजित लाटा
ललाट आपण मोजतो
इथे अनाथ होता साथ
कोण कुणास रे देतो

हे जगणे असेच असते
युद्धात जसा रे स्वार
खांद्यावर बुद्ध उमलता
युद्धाचा वाटतो भार

इथे द्यावे अपुला घोडा
घेऊन तरीही शस्त्रे
युद्धावेळीच नेमकी
बुद्धाची गळतात वस्त्रे

युद्धात तरीही असतो
एक क्षिण पण दिव्य दिलासा
जिथे वस्त्रे असतात गळत
तिथे उगवत असतो आरसा

## प्रश्न

पाहून चेहरा आरश्यात
उजळतो माझा चेहरा
असतात आतच भास
पण कोसळत नाही पारा

हा आरसा म्हणजे बुद्धच
प्रतिबिंब करतो लवचिक
मी करतो गोळा सत्य
चेहऱ्याची मागत भीक

नांगरतो त्याची काया
पाराही अखेर हरतो
देहातून माझ्या देहात
प्रतिबिंब माझे पसरतो

उतरताना प्रतिबिंब
हा प्रश्न सनातन वळे
मी आहे काळा तरी का
प्रतिबिंब माझे निळे

## तृष्णांनो

बुद्ध माझ्या तळहाती
मला पण नाही डोळा
देहात चाले तृष्णांच्या
पेटण्याचा हा सोहळा

तुम्ही उठा तृष्णांनो जा
घेऊन हे शब्द सारे
जमवा त्यांना ज्ञानामध्ये
सत्या जोडा स्कंध सारे

मार येईल हाती द्या
त्याच्या मृत्यू माझा गोरा
होईल षंढ तर त्यास
माझ्या काळ्या हाती पुरा

## शब्दांनो

या ऐका ए शब्दांनो
हा स्व खोदता खोदता
तो येईल बुद्ध इथे
मला शोधता शोधता

तो आणील काही गाणी
देहातील तृष्णा जाळेल
एकेका दुःखावरती
एकेक निर्वाण ढाळेल

ती ऐका गाणी सारी
तृष्णा साऱ्याच मालवा
गाण्यात पुरूनी त्यांना
मुक्काम तुमचा हलवा

तृष्णासह जातील विझून
माझी सारीच गाणी
भटकत राहील सत्य
घेऊनी एक विराणी

कधीतरी मग भेटेल
तो.धम्म त्याला सांगा
नको करू तू कधीही
शब्दांशी पण्डिती दंगा

## खंत

शब्दातित होतो मी
जमत राहती गाणी
हे विश्व होते पात्र
काया होते पाणी

मजला मिळत नाही
माझ्यामधला संत
विश्वात वाहताना
देहात असते खंत

## धनुष्य

अंधार जसा स्वीकारतो
तसा स्वीकारतो सूर्य
अनंत विश्वात हिंडतो
घेऊनी सांत वीर्य

तृष्णांचे घोडे मुक्तच
शून्यच असते सारथी
भोगात नाचता नाचता
योगाची गातो आरती

काळाचे पाणी बदलते
तरी नदी राहते नदी
मी कापून देतो पाय
लाटातून येता गारदी

हा विरोध आंतरीक का
प्रश्नांना नाही उत्तर
जेहत्ते कालाठायी
सांभाळतो विश्वे बहात्तर

जे असतात इथे चेहरे
ते असती तिथे मुखवटे
जे संपूर्ण असते ते ते
नेहमीच असते एकटे

मी आहे फक्त अनंत
ज्यातील सर्व गतिमान
मी धनुष्य केव्हाच मोडले
तुम्ही शोधु नका बाण

## देहपूजेत असता

देहपूजेत असता दुःख देहामध्ये येते
क्षणाक्षणाला नग्न त्याचा देह पसरते

हाती असती त्याच्या तृष्णांचे ठोस ठसे
चेहरा जिथे पेरे तिथे उगवती आरसे

दिसतात जिथे बोधी शून्य तिथे उलगडते
पेशीपेशीत माझ्या बुद्ध थोडे उडवते

सुन्न गंभीर होऊन देते मजला अधर
शोधून काढते चन्द्र पौर्णिमा नसते दूर

तरीही कळत नाही कुठे हरवती गाणी
स्वर उमलण्यापूर्वी कण्ठात फाटते पाणी

## शस्त्रक्रिया

असतो विरक्त एकटा देहात माझ्या पडूनी
मेले शेकडो चन्द्र पौर्णिमा शोधूनी

फुंकू नकोस देहात उर्जेचा उष्ण धूप
काळजात पेटत नाही आता साधा दीप

अंथरू नकोस शून्य माझीच नाही ग्वाही
बुडाले किती जन्म मजला माहीत नाही

नको मोजू बुद्धा आता देहावरचे टाके
पिकूनी शस्त्रक्रिया उलटून गेली शतके

## शून्य

जगत गेलो सत्य जगवीत अर्थ नवा
शून्याने शून्याला जशी सांगावी अफवा

## कोठडी

ही जागा पुरेशी आहे
तू वाढव तुझा हा वृक्ष
कोठडीत जगणाऱ्याचे
कोठडीच असते भक्ष्य

कोठडीतील प्राणवायू
तुझा शोधेल निळा श्वास
हे हिरवे हिरवे अंधार
वाढण्याचा देतील भास

तू अस्तापर्यंत वाढ
मृत्यूशी मिळवून डोळा
पांगळ्याला देऊन काठी
चालत राहील आंधळा

कोठडीत भटकत भटकत
गोळा कर तुझे अंत
ही जागा पुरेशी आहे
तू बनून जाशील संत

## दार

मी मांडू कशी माझ्या
कर्माची काळ्या कुंडली
नियतीची दिसत नाही
हातात कधीही गल्ली

बीजेही गेली पिकून
अन कर्म झाले भगवे
कळत नाही कोण कुणास
जन्ममृत्यूपैकी उठवे

महामाया महाकाया
टाकते भारूनी शून्य
जन्माचा लावून पारा
देहाची जमवते धून

जन्मांची गस्त अशी का
कळले न कधी मनाला
इथे जगल्यानंतर मृत्यू
का येते सत्य उशाला

कुणी नाही देत उत्तर
फक्त धावते जाणीव गार
दिसते घर शून्यात
पण नसते त्याला दार

## ओल

तू निराश नको होऊस
अरे अजून उजळते तम
उजळीत उधळीत शून्य
उतरतो अजूनी उगम

मिसळीत जातो अंतात
अजूनी कोणी अनंत
शून्यापर्यंत पोहचतो
अजुनी कोणी महंत

भोवताली महादुःखे
तू निराश नको होऊ
तुझ्याही मृत्युमध्ये
भूपाळी लागेल गाऊ

तू घाबरतोस कशाला
पाहून दगडी गाणी
जागत आहे डोळ्यात
शून्याचे स्वच्छ पाणी

शून्यातील जीव आपण
शून्यातच जाऊ खोल
बघ तुझ्या झिरपली देही
शून्याची हिरवी ओल

## मुक्ती

मी भोगून आलो मृत्यू
विश्वाला देऊन काया
देहामधूनी हिंडली
विश्वाची भगवी माया

संपूर्ण काया उजळली
श्वासांची मिटली खिडकी
झेपावून अवकाशात
माती चालली दुडकी

भोवताली स्वच्छ झाले
डोळ्यांना आली जाण
अस्तित्व प्रकाशित झाले
दिशांचे जाळुनी भान

कोसळली समग्र माया
बुद्धुचा झाला बुद्ध
एक वाद्य वाजले आणि
चराचर हे झाले शुद्ध

असण्याचा नग्न पिसारा
मोहरली छाया छाया

मी मृत्यू भोगून आलो
विश्वाला देऊन काया

## कृपया

कृपया
माझ्या आयुष्यातील कोणत्याही घटना
मला ऐकवू नका
मी काहीही स्वीकारणार नाही
मी काहीही नाकारणार नाही

माझ्या बालपणाच्या अजाणतेत भिजलेल्या कथा
तुम्ही हुंगाल तर लगडतील
तुमच्या श्वासांना कदाचित निष्पाप गुलाब
तिथल्या साम्राज्यात
बुद्ध शिवाजी वगैरे शोधाल तर
त्यांच्या अंगावर कदाचित असणार नाहीत पोशाख
तिथल्या रस्त्यावर हिंडणारे
दगडमाती इष्टॉपपालटी, गटारी फुंकणे, गोट्या,
हुतूतू, मारामाऱ्या, क्रिकेट, फुटबॉल
वगैरे सारेच संदर्भ आहेत सामान्य
आणि
योगाच्या कुठल्याच सर्गाची सुरवात
सामान्य नसते असे मानतात
तेव्हा कृपया
मला माझ्या बालपणातील कथा ऐकवू नका
मी काहीही स्वीकारणार नाही
मी काहीही नाकारणार नाही

खरंतर मी केला होता माझ्याही देहाला
वासनांच्या सोळा कळा जोडण्याचा मूर्खपणा
पण एका क्षणाच्या फुलपाखराने आणलं हिंडवून
मला काळाच्या प्रत्येक फुलावरून
नाचवलं मला अस्तित्वाचे अद्वैती घुंगरू पायात बांधून
विश्वाच्या मांडीवर
मोक्षाच्या काठाकाठावरून हिंडणारे माझे चेहरे
ढकलून दिले मी शून्यात

नेणिवेच्या अचेतन वाती
मी दुःखाने पेटवून
उजळलो कैकदा त्यांच्या प्रकाशात
यावेळीच मी
शब्दांच्या पाऱ्याची तयार केली टेस्टट्यूब
आणि पृथ्वीचे पाणी करून
तापवलं तिला शब्दात
शोधला तिचा उत्कलनबिंदू

पृथ्वीचा उत्कलनबिंदू नेमका किती
कृपया मला विचारू नका
मी काहीच सांगणार नाही
मी काहीच बोलणार नाही

आताशा मी मांडतो
मोक्षाची नक्षत्रशून्य कुंडली
सांडतो अवकाशाच्या त्वचेवर
माझ्या काळजातून धडकणारे
चिमूटभर मृत्यूचे नागडे थेंब
शोधतो विश्वाच्या मयसभेचे
निगेशनच्या गतीतून काही यमनियम
एखादे दिवशी मीही ठोठावेन
देहाच्या गल्लीत हिंडत हिंडत
अवघ्या विश्वाचे दार
आणि कदाचित मलाही
हे संपूर्ण विश्व
आनंदाने सामावून घेईल स्वतःत आरपार

मात्र तिथेच निर्वाण असेल की नाही
कृपया मजला विचारू नका
मी काहीही स्वीकारणार नाही
मी काहीही नाकारणार नाही

## आत्मप्रवास

कितीही लिहिले तरी
मोकळाच होत नाही आत्मप्रवास

किती सांगावं
किती ऐकवावं
कवितेच्या कुठल्याही देहाला
लगडलेली असतात माझीच हाडं
अस्तित्वाची कोणतीही दृष्टी देहातून उचला खोलून कवाडं
तिच्यात माझ्या डोळ्याची आढळेल माती
आणि तरीही सतत वाटतं की
ह्या मातीत न मिसळणारं असं काहीतरी आहे अनादी

काय आहे ते

माझ्या काळजाचं हरेक पाखरू
मी कितीदा तरी सोडलंय अवकाशात
कितीदा तरी बांधलेत
मातीच्या पायात शून्याचे घुंगरू
तरीही मला यश नाही

तुम्ही कुठल्याही योगसाधनेत हिंडा
तिथे माझ्या हातावरच्या रेषा प्रयत्न करताना आढळतील
खरेतर सारेच अभोगी चेहरे
आरश्यापर्यंत पोहचत नाहीत
हे मला कळतं
तरीही वाटतं
काहीतरी सापडावं
काहीतरी सांगावं
करून टाकावा हा आत्मप्रवास आत्मशाप एकदाचा मुक्त
करावे सारे अस्तित्व आरश्यासारखे स्वच्छ
पण काहीच येत नाही सांगता
ओठ उचलले की
मोडून पडतं धनुष्य कण्ठात
आणि संवेदनांची सारी तयारी
अपुरीच आहे हे येतं लक्षात
उर्जेच्या कोणत्याही प्रवाहात तुम्ही घाला हात
माझ्या काळजाची जळून गेलेली फुले आढळतील त्यात
आणि तरीही मी हा असा
मुक्तीपासून वंचित तिचा पोकळ वसा

घर नाही की दार नाही
कशाचाच आधार नाही
कुठल्याही दगडावर झोपताना
वासनांची अंगाईगीते करतात माझा पाठलाग
आणि स्वप्नांची मयसभा
पुन्हा एकदा बळकावते माझे स्वातंत्र्य
माझी आभा माझा गाभा

## घोडे

माझे सप्तरंगी घोडे
इकडे येताना पाहिलेत का हो ?
मला त्यांना भेटायचय

आत्मविलोपाच्या कोणत्याही भूमीवरून हाताळा तुमचे कर्म
तृष्णा मोकळ्या होणारच सोडवित त्यांचे वर्म
इंद्रियांच्या मूळाशी असणारे शून्याचे स्वर
मी लागलो उलगडू
आणि काळाच्या एकेका वस्त्रातून
गळू लागले नागवेपण गोड आणि कडू
मी विचारले
तोण्डात वासना घेऊन जन्मणाऱ्या सर्व प्राचीन उत्क्रांतिची
मी तुम्हाला दाखवू का यादी ?
उत्तर मिळण्याऐवजी
खिडकीच्या एकेका गजाचे वाद्य झाले संवादी
आणि उघडला देहाचा
मला माहीत नसलेला दरवाजा
आणि ते उधळले शोधीत बुद्ध ताजा

माझे सप्तरंगी घोडे
तुम्ही इकडे पाहिलेत का हो ?

साऱ्याच कविता असतात आत्मविराण
सारेच कवी पोरके
सत्याला भाषेने लावलेल्या वणव्यात
जळू लागली माझी कविता भगव्या रंगात
आणि तिच्या फांदीवरून

सत्य उडाले आसमंतात
आत्मसंहाराच्या शुभ्रधवल घटनेतून
हाती लागलेले फळ
मी घाईघाईने ढकलले शब्दाच्या चोचीत
आणि धम्मपद वाचीत
मला माहीत नसलेला देहाचा उघडला दरवाजा
आणि ते उधळले शोधीत बुद्ध ताजा

माझे सप्तरंगी घोडे
तुम्ही इकडे पाहिलेत का हो ?

सूर्याचा दररोज एक थेंब हातावर घेऊन
पृथ्वीच्या इंद्रियात दिवस गुंफणाऱ्या महाकाळाची
मी घेतली शपथ
उधळून टाकली माझी प्राक्तनं
तळहातावर चालवत आत्मप्रकाशाचा रथ
सूर्याच्या कोणत्याही पंखावरून फिरवा हात
तुमची आयुष्यरेषा जळून जाते प्रकाशात
प्रकाशाच्या कोणत्याही सिंहासनावर
तुम्ही झालात आसनस्थ
की होत जातो तुमचा अहंकार नष्ट
मला हे होऊनही स्पष्ट
मी फिरवला हात
आणि देहाचे मला माहीत नसलेले उघडले दार आतल्या आत
आणि ते उधळले ताज्या बुद्धाच्या शोधात

माझे सप्तरंगी घोडे
तुम्ही इकडे पाहिलेत का हो ?

अस्तित्वाच्या कुठल्याही अवयवातून
पाय ठेवले पाण्यात
की अस्तित्वाची जाणीव होत जाते नष्ट वाहण्यात
आणि जाणवत राहते एकच सत्य
इथे पाणी
तिथे पाणी
आणि पायातही पाणीच पाणी
मांडीतल्या कुठल्याही रक्तवाहिनेला समुद्रात सोडा

समुद्राच्या लाटावर जी जहाजे हिंडताना दिसतील
ती सारीच बुडवून टाकेल पाण्याचा घोडा
मला हे माहीत होते तरीही
मी सोडलेच पाण्यात पाय
आणि ते उधडले

माझे सप्तरंगी घोडे
इथे धावताना तुम्हाला आढळले का हो ?

गतीच्या पोकळीत जाणवणारी हालचाल
तुम्ही मृतवत कानात गोळा कराल ?
वाऱ्याच्या साऱ्या गर्भार कळा
तुम्हाला आईच्या गर्भाशयातून ऐकता येतील झेलीत झळा
मूलद्रव्याच्या शेवटच्या कक्षेला
नेहमीच असते एका नव्या कणाची गरज
विजेतून धावणारे गतीचे आदीम प्रवाह सहज
एकाएकी चमकले की
कुंडलिनीत वेटोळे घालून बसलेल्या साऱ्या आदिम शक्ती
उघडतात तृतीय नेत्र
आणि पर्याय एकच उरतो
सृजन किंवा मृत्यूचे पात्र
मी त्यातील स्वीकारला एक
आणि संभोगोत्सुक देहासारखा
मला माहीत नसलेला माझा दरवाजा उघडला नेक
आणि ते उधळले

माझे सप्तरंगी घोडे
तुम्ही इकडे पाहिलेत का हो ?

पृथ्वीचा घडा कवेत घेऊन केव्हाही हिंडा
विश्वाच्या प्रत्येक हाडात
तुम्हाला स्पंदनताना आढळतील यमनियम
मातीत तुम्ही काहीही शोधा मातीत करा कितीही विक्रम
मातीच मिळेल बदलत मातीचा क्रम
घटावकाशाच्या आभाळातून निर्णायकी निर्णय घेण्याची
तुमच्यात आहे कुवत ?
नसेल तर करा अवगत दुःखांची कला शतप्रतिशत
मी ती केली

आणि गतिचा विकास व अभ्यासक्रम मला झाला ज्ञात
आणि देहाचा मला माहीत नसलेला दरवाजा उघडला अज्ञात
आणि ते उधळले

माझे सप्तरंगी घोडे
तुम्ही इकडे पाहिलेत का हो ?

इच्छांच्या पहाऱ्यात असलेले सारे अमृतकुंभ ओळखू शकतो मी
विषाच्या लिपीवरून
अक्षरांच्या वर्णमाला आणि स्वरांच्या बाराखड्या
उपयोगी नसतात युद्धात खड्या
शून्याच्या कोणत्याही श्वासात तुम्ही ठेवा प्राण
तुम्हाला प्राप्त होईल अमरत्वाचे त्राण
मला ते झालं
आणि युद्धभूमीवर साऱ्या इच्छांनी स्वीकारलं निःशस्त्रीकरण
आणि देहाचा मला माहीत नसलेला दरवाजा उघडला निर्कारण
आणि ते उधळले

माझे सप्तरंगी घोडे
तुम्ही इकडे पाहिलेत का हो ?

बुद्धाच्या महानिर्वाणानंतर
त्याच्या ओठावर असलेले अंतिम शब्द जिवंत करून
मी ते माझ्या काळजात पुरले सगळे
तेव्हापासून माझ्या काळजातील बोधींना येतात कमळे
सत्यभामेची कथा तुम्हाला माहीत असेलच
वेदनेच्या साम्राज्यांना नसते राजधानी
आणि चेहऱ्यांनी आरसा अधिकच होतो मलीन
हे मला कळल्यापासून
माझ्या काळजाचे एकेक कमळ
कवितेच्या दारात गळतेच आहे होऊन लीन
तेव्हापासून माझ्या साऱ्या महाशब्दांना शालीन
मी लावलाय माझ्या रक्ताचा टिळा
आणि भेटेल त्या विधवेला
माझा सौभाग्यवती चेहरा वाटत चाललोय जिवंत करत शिळा
त्यामुळेच की काय
देहाचे एकेक करून सारे दरवाजे झाले सताड उघडे
आणि एकेक करून उधळले माझे सारे घोडे

माझे सप्तरंगी घोडे
खरंच तुम्ही इकडे पाहिलेत का हो ?

## श्वास

श्वासांना कसलाही संदर्भ दे

उदाहरणार्थ हा गेलेला
तिने वक्षावर हात ठेवून
तिच्या डाव्या हाताची रेषा तुझ्या उजव्या हातावर ठेवली
त्यावेळी हा धपापला
आणि अलगद बाहेर पडला

श्वासांना कसलाही संदर्भ दे

उदाहरणार्थ तो येत असलेला
बघ बघ
नाकात शिरण्यापूर्वी त्याची पावलं घुटमळतायेत
आणि स्वतःच्या चेहऱ्याचे प्रेत उचलून
तो अस्वस्थपणे फुप्फुसाळतोय
बघ तुला काही कळू न देता
तो बाहेर पडतोय

श्वासांना कसलाही संदर्भ दे

उदाहरणार्थ तो त्या झाडाच्या शाखेवर
तयारीत असलेला
जेव्हा प्राणवायूच्या वहाणा पायात घालून
तो तुझ्यात शिरेल
फुप्फुसातील भाषेत
त्याची वजनदार काठी आपटत हिंडेल
तेव्हा तो शब्द होईल
आणि कविता बनून अलगद बाहेर पडेल

श्वासांना कसलाही संदर्भ दे
कुठेही
मात्र नंतर ते शोधू नकोस
त्यांचा वारा झालेला असेल

### साक्षात्कार

ही वस्तू
ती वस्तू
ह्यांचा एकमेकाशी संबंध काय
ह्या आल्या कोठून
ह्या जाणार कोठे
मी ह्यांच्यासाठी एक करू शकेन
हातावरील रेषांनी
आकाशाच्या फलकावर काही कविता लिहीन
मातीच्या मुलांना शिकवेन

अ अ अवकाश
ब ब बडबड
क क कमळ
ड ड डमरू
आणि समोरच्या शिवाच्या मूर्तीला
तिसरा डोळा फुटू लागला
की शांतपणे मरून जाईन

### नकार

सारेच पाऱ्यासारखे उडून गेलेले

दुःख भरात आल्यावर
कण्ठ दाटून यावा
तसा अवकाश आलाय दाटून
आकाश पाहण्यासाठी मी उघडलेले डोळे
माझ्याच पायापाशी पडलेत गळून
हे विश्व वेचण्याची ताकदही नाही त्यांच्यात
मी अगतिक बाहेर आणि आत

शब्दांनी नुकताच काठी होण्यासाठी नकार दिलाय

### शब्दांच्या अंतरावर

शब्दांच्या अंतरावर काहीही असू शकते

डोळे
ओठ

वक्ष
योनी
काहीही

प्रश्न असतो
संभोगाच्या प्रदेशात त्याला उतरता येईल का ?
पिसाटीच्या ढगात स्वतःचे रक्त मिसळून
त्याला भरभरून बाईत कोसळता येईल का ?
गाफीलपणे उत्क्रांतीने केलेल्या चूका
त्याला गर्भाशयात जाऊन सुधारता येतील का ?
स्वतःच्या देहाचा पिसारा फुलवून मनमुक्त नाचता येईल का ?

शब्दाच्या अंतरावर काहीही असू शकते
डोळे
चोच
पंख
घरटे
काहीही

प्रश्न असतो
अवकाशाची स्पंदने हृदयात तोलता येतील का ?
पक्ष्यांच्या दिशांतरातून
स्वतःचे परतीचे प्रवास उमगतील का ?
घरट्यांच्या आदिरचनाचे समृद्ध नियम
काळजात विरघळवून विकसीत करता येतील का ?
भटकंतीच्या बेभरवश्यांना
निश्चिततेच्या परिसवेळा बांधता येतील का ?

शब्दांच्या अंतरावर काहीही असू शकते
समुद्र
पाणी
ढग
घागरी
काहीही

प्रश्न असतो
ढगाची एकेक साल सोलून
पाण्याचे अवाढव्य फळ पोटास पचवता येईल का

कारुण्याने उजळलेले डोळे घामात बुडवून
सारे देह नीट नांगरता येतील का ?
पाण्याच्या खांबातून एखादा महापुरुष उगवला
तर मनाच्या डोंगरावरून प्रत्येकक्षणी
धबधब्यासारख्या कोसळणाऱ्या भक्तीला
सारे विश्व कवटाळूनसुद्धा
स्वतःत वहाते ठेवता येईल का ?

शब्दाच्या अंतरावर काहीही असू शकते
प्राण
उर्जा
कुंडलिनी
अवकाश
आणि तुम्हीही

प्रश्न असतो
स्वतःच्या आदिम नातलगांना
कुंडलिनीतील उर्जेचे अस्तित्व पटवून देता येईल का ?
मणक्यात असलेले उर्जाचक्र
पेशीपेशीने ढकलत
स्वतःच्या माथ्यापर्यंत आणता येईल का ?
काळाचे सारे संदर्भ वगळून
अवकाशाचे सर्ग वाचता येतील का ?
कैवल्याच्या नग्नतेची मूक ओळख गवसली तर
शब्दांच्या अंथरूणावर
स्वतःचे अस्तित्व
समग्रपणे अंथरून
हे विश्व पूर्ण भोगता येईल का ?

शब्दाच्या अंतरावर काहीही असू शकते.

## दिवस

कुठल्याही दिवसाचा मी करीत नाही द्वेष
की चढवत नाही त्यांना कसला वेष
कारण प्रत्येकाजवळ असतो
एक सूर्य
एक उदय

एक अस्त
म्हणूनच किरणांचे घोडे अंगणात आले मस्त
की मी घेतो त्यांना घरात
खाऊ घालतो हरभरे
वाजवतो अस्तित्वाच्या व्हायोलिनवर
माझा मोक्ष माझी आत्महत्या
त्यावेळी घरभर झालेले स्वर
आणि माती झटकणारे त्यांचे निष्णात पंख
उचलून घेतात उरात प्रकाशाची गाज
आणि सूर्याला फुटलेले दिवसाचे फळ खाऊन
पुष्ट करत जातात काळाचा आवाज
आकाशाचं घटीकापात्र केव्हा होतं कळत नाही
फक्त प्रकाशाची वाळू कणाकणानं होत जाते कमी
आणि सूर्य शांतपणे मावळतो
व्हायोलिनच्या प्रदेशात

उरलेले आकाश
गाण्याचे असते

## पाऊस - २

ढग जमा झाले की
मोकळा होतो कण्ठ
सुचू लागते आषाढाचे भरगच्च गाणे
न कळणारे प्रश्न न परतणारे जाणे
मी मग काहीच नाही करत
उत्तरे शोधत नाहीत की शब्द
ढगांच्या देहातून पाणी पिळण्याची ताकद
नसते माझ्यात
जमिनीच्या दुष्काळी गर्भाशयात
पाडू शकत नाही मी पाऊस
फक्त स्वतःच्या तहानेच्या पायात
बांधतो काही घुंगरू
आणि चातकासारखी वाट पहात
होऊन जातो पाऊस
स्वतःच

## पृथ्वी

पृथ्वीला कोणत्याही गतीची वस्त्रे नेसवा
मी म्हणेन
ती माती आहे

झाडावर फुलणारी फुले
गर्भाशयात वाढणारी मूले
अंडी फोडून बाहेर येणारी पिले
द्विविभाजन करून वाढणारे जीव
कवितेच्या पायातील शब्दांच्या वहाणा कातीव

कुठूनही करा सुरवात
कथांना द्या निरनिराळे रंग
आगळेवेगळे अंग

द्या त्यांच्या विनाशांना सृजनाचा वर
करा काहीही होऊन अनावर
प्रत्येकवेळी हवेच्या श्वासात जाणवेल
मृत्यूची मुक्त हालचाल
पोहत येतील अमिबा
गोलकिडे गांडुळे खेकडे तारामासे
असंख्यात अनंतात
पण पहाता पहाता पिऊन टाकेल समुद्र त्यांना
पाठवून देईल पृथ्वीच्या अवयवखान्यात
आणि शेवटी निवांत मारेल
उत्क्रांतीचे नाव घेत

त्यावेळी काय कराल
तुम्हाला तर वळता येणार नाही मागे खाता येणार नाही कच
मग उरेल मार्ग एकच
प्रार्थना
तुम्ही उभयचरांची कराल प्रार्थना
ताराल पुन्हा एकदा अस्तित्व ताठ बनवून पाठीचा कणा
मग एकाएकी फुटतील तुम्हाला पंख टिकाऊ
हाताच्या प्रत्येक कोपऱ्यात प्रज्ञा लागेल झेपावू
आणि एकाएकी चमत्कारासारखे बनून जाल तुम्ही सस्तन
माणसाच्या नेमक्या कोणत्या हाडापुढे आपण होत आहोत जमा

ह्याची करण्याआधी खातरजमा
तुम्ही व्हाल माणूस
व्हाल तुम्ही माणूस
वाढाल
पसराल अवकाशभर
आणि मरून जाल एखाद्या शतकात
आपण का जन्मलो हे कळायच्या आत
पटकन
कुणाला काही कळू न देता
अनामी झटकन

पृथ्वीला कोणत्याही गतिची वस्त्रे नेसवा
मी म्हणेन
ती माती आहे

## गाणे

शब्दात कोणत्याही सत्य पेरा
मी सांगतो
विश्वात गाण्याखेरीज काहीच उगवणार नाही

पण तुम्ही करता तयार फक्त
विमाने
रडार्स
अंतराळयाने
आणि कम्प्युटर्स
ही तर सारी तुमच्याच भूतकाळाची रास
प्रत्येकाच्या हाडाला तुमच्याच भविष्याचा शाप
मग त्यांना कसे काय मिळणार मितीपलीकडचे प्रवास
कसे काय नेसणार ते निखळ वर्तमानाचे शुभ्रधवल वस्त्र

भरती ओहोटीची वेळापत्रके
काळाचे नियम
अवकाशाचे यम
सारे सारे तिथे निकामी
त्यांच्या सहाय्याने फारतर तुम्ही करू शकाल
तुमच्याच अवयवांचे विश्लेपण
पुन्हा एकदा मांडाल

त्याच सनातन मयसभेची भौमितिक रचना तिचे संश्लेषण
पण त्याने काय होणार ?
एक नवीन मयसभा
पहिल्यापेक्षा आकर्षक
पहिल्यापेक्षा अधिक सुबक

त्यापेक्षा शोधा
तुमच्या अंतर्मनात लपलेले भितीचे ताण्डे
मेंदूच्या ठायी ठायी लपलेली काळाची जाणीव
भविष्याच्या ओझ्याखाली वाकलेले तुमचे पाठीचे कणे
श्वासाच्या प्रत्येक अवयवात प्रतिमा जपण्यासाठी चाललेली धडपड
आणि तुमचा सनातन आळशीपणा तृष्णेचा गड
शोधा
आणि फक्त अवलोकन करा
अवलोकन करा स्वतःचे
'स्व' नष्ट होईपर्यंत
मगच
कदाचित मगच
सापडले तर सापडेल सत्य
मुक्त होणाऱ्या उर्जेच्या नद्या
त्याच उचला
आणि सोडा विश्वात
मी सांगतो
कुठेही गाण्याखेरीज
काहीही उगवणार नाही

## डोळे

शब्दांना कागद नेसवणारे कवी
पावलोपावली भेटतात मला
म्हणूनच उतरवत नाही मी कागदावर शब्द
फक्त नेसवत जातो त्यांच्या विवस्त्र देहांना
माझी त्वचा माझी वाचा
तरीही मला डावलून मोडून माझा साचा
ते कागदावर कोसळतात तेव्हा
पहातही नाही मी त्यांचे देह त्यांचा क्रूस त्यांचे खिळे
फक्त त्यांचे मृत्यू

नीट पहाता यावेत म्हणून
निवांतपणे खिशात ठेवून देतो
माझे दोन्ही डोळे

## शक्यता

कुठल्याच कवितेला नसतो
आदि किंवा अंत

झालीच तर निर्माण होतात
शब्दांच्या संबंधातून काही अनौरस अपत्ये
आणि शोधलेच तर मिळते
एखादे धपापणारे गर्भाशय
म्हणूनच
कोणत्याही प्रसववेदनेच्यावेळी मी असतो शांत आणि नेक
शब्दांचे अर्थ शोधत नाही
की अनर्थ
फक्त ते मांडत जातो एकामागून एक
त्यातून निर्माण होणाऱ्या अपत्यांच्या साऱ्या शक्यता
वाचकदायांच्या नावावर करून

## खूण

आकार आणि निराकार
यांच्यात हिंडणारे हे कवितेचे पक्षी
आकाशाशी संभोग करण्याची ताकद
नाही त्यांच्यात
तरी ते अज्ञाताचा मागोवा घेत उडताहेत

माझ्या वहीत आहेत
फक्त त्यांची काही घरटी
आणि शेवटच्या पानावर त्याचं मृत्यूपत्र
ते उडाले त्याची एकमेव खूण

## वारा

हाकलावा म्हटलं तरी
हाकलता येत नाही वारा

देहाच्या संरचनेची पोकळी जाणवली
की तो सरळ घुसेल आत तरारा
उसवेल छातीची एकेक बरगडी
आणि पायापासून माथ्यापर्यंत
निवांत गोळा करत हिंडेल मृत्यूचा पारा

त्याला अडवण्यासाठी काय करू शकतो आपण
कोणत्याही वाऱ्याची खार करण्याचा पण
जिंकण्याची ताकद आपल्या मंत्रात नसते
शेवटी शब्द ही
श्वासांचीच निर्मिती असते
हे कबूल करूनही

## संभोग

संभोग मला पकडता येत नाही
त्याला कोणताच नियम नसतो

कुठल्याही अवयवापासून सुरवात करा
शेवट शेवटी अनिश्चित अस्पष्ट

आरंभ शोधा
अंत शोधा
मध्य शोधा
उपांत्य शोधा
काहीही मिळणार नाही
केवळ बिंदूमागून बिंदू
ज्यांना कसलाच आकार नाही
सूर नाही
दृश्य नाही
स्पर्श नाही
व्याख्या नाही
केवळ विस्कळीत सुसंघटन

संभोग मला पकडता येत नाही
म्हणूनच सृजनही

## सृजन

सृजनाला नसतो
कोणताही आकार
आधार
दिशा
नशा
असते ती फक्त आंधळी गती
तिच्यामध्ये
उ
भे ठाकाल
तर धडा
वेगळी
होतील
मुंडकी
तिला पकडाल
तर हातावरच्या रेषांना
ती
करायला
लावेल
आत्महत्या
तिच्या जवळ जाल
तर
इं
द्रि
यां
च्या
त्व
चा
सो लू न
ती खाऊ घालेल सर्वांना

तिच्यावर असूयेने

टाकाल तर नजर

बु बु ळा चे का टे जोडून

ती करेल

त्याचे कालमापक यंत्र

म्हणून तुम्ही तिच्यासाठी फक्त एकच गोष्ट करा सुतंत्र

प्रा र्थ ना

कुठल्याही चर्चमधील

घ न गं भी र घं टां चा आवाज

तिला

आवडतो.

*

# ६. युरेका

## प्रवास

॥१॥

गुण्डगिरी राजकारण तत्त्वज्ञान
प्रत्येकात माझा तरंग प्रत्येकात माझा कण
क्रमशः भटकवून मी माझे मन
कवितेत भाषेत कलेत
उत्क्रांतीच्या सर्व टप्प्यांना चिरशांती देत
ओतत
अस्तित्वातील रचनातील बदल
शब्दाशब्दात
प्रत्येकवेळी रचना बदलवूनही माझे दुःख दुःख का ?
माझ्या वेदना वेदना का ?
माझ्या तृष्णा तृष्णा का ?

॥२॥

मी शोध घेतोय
माझा माझ्यातच माझ्यासाठी
माझ्यातच मी शोधण्यासाठी काढून लंगोटी
पाठी आणि पोटी

॥३॥

मी गुण्डगिरी केली म्हणजे केले काय ?
माझ्यातील माकड जपले आणि गमावून बसलो गाय ?
माणसं
पोळ्यापोळ्यांनी टोळ्याटोळ्यांनी
शस्त्रे घेऊन
त्यांना हवे होते माझे हात
माझे डोळे
माझे पाय
मीही कधी नव्हतो षंढ नव्हतो भयाचे चलनवलन
मांडले नाही मी कधी अंगणात अहिंसेचे कीर्तन
कागदातून गोळा नाही केले युद्धाचे पुरावे

मारावे वा मरावे
माणसांच्या बारखड्यांनी शिकवलेली कोल्हापूरी रीत मी गिरवली
फिरवली भर बाजारपेठेत तलवार सायकलची चेन जिरवली
मी गुण्डाचे हात छाटले
मी बलात्कारवाल्याचे लिंग कापले
मी गाय शाबूत ठेवण्यासाठी माकड हवे तसे उडवले
मी हिंसेला माझ्या शस्त्रात जोपासले वाढवले

॥४॥

कार्ल मार्क्स
हिंसेतील नैतिकतेला वैश्विक करण्याचा माझा प्रयत्न
राजकारण आणि अराजक
दरम्यान माझे दारिद्र्य चकाचक
गर्भाशयातच कळले मला बावीस फूटी सत्य
मेंदूपेक्षा आतडेच आयुष्यात पावत महत्त्व
माझे ग्राईप वॉटर होते खारट
स्तन आईचे वाळलेले
मी जगायला सुरवात केली तेव्हा
भाकरीने मला टाळलेले
मी दास कॅपिटलच्या चुलीत ठेवले माझ्या भुकेचे निखारे
ग्रंथांची कणीक तिंबून लाटली क्रांतीची भाकरी पाठी पोटावर
नोंदवली पक्षात तक्रार
माझे अन्न हरविल्याबद्दलची
पण इथेही तयारच होत्या टोळ्या
हातात तलवारीऐवजी कागदाच्या पोळ्या
भर बाजारपेठेत मी उतरवून ठेवली माझी शस्त्रं माझी हाडाची काडं
शोधली कागदाकागदात जातीची गालफाडं
बाईचे स्तन नीतीची कालवडं
मी झालो लोकगीतासारखा नंगा नागवा
पण ह्यांनी गायला कमिटींच्या शास्त्रीय बैठकीत सिद्धांताचा मारवा
मी बुडवला गणेशोत्सावात दास कॅपिटल समुद्रात
आणि जे नास्तिकतेचे मीठ लागले हाती ते भुकेत ठेवून दिले

॥५॥

अ पासून सुरवात करता ज्ञ पाशी होतो शेवट
जे सत्य ऐकू येते तो असतो अफवांचा कट

शब्दातून शब्दाकडे शब्दकोषातून
चिन्हातून चिन्हाकडे चिन्हकोषातून
बाहेरून आणि आतून
जे सत्य वाहत असते ते सत्य जाते कुठे ?
चिन्ह काय व्यक्त करते कोण चैतन्याला लुटे ?
माणूस चिन्हात जन्मतो
चिन्हात वाढतो
चिन्हात मरतो
जो सत्याच्या समुद्रात बुडतो तोही चिन्हात का तरतो ?
जेव्हा एक पशू आतड्यात तडफडतो
एक देव सत्यात फडफडतो
तेव्हा एक माणूस कवी बनत
चिन्हात धडपडतो चिन्हात लडबडतो
चिन्हात घडतो चिन्हे बडवतो

॥६॥

शस्त्रातून सत्तेकडे
सत्तेतून सत्याकडे
सत्यातून कवितेकडे
मी चाललोय घेत शोध
माझा
माझ्यातच
माझ्यासाठी
माझ्यातच मी असण्यासाठी
काढून लंगोटी
पाठी आणि पोटी.

पक्ष – १

॥१॥

आयुष्य गर्भाशयातून सुरू होते
आयुष्यं गर्भाशयापाशी संपते
इस्पितळ विज्ञानाचे गर्भाशय
चिता मृत्यूचं गर्भाशय
जगणे पृथ्वीच्या गर्भाशयातील यात्रा
बनणे संस्कृतीच्या गर्भाशयातील प्रवास

हसणे आनंदाच्या गर्भाशयातील ओठ
रडणे दुःखाच्या गर्भाशयातील डोळा
लिहणे भाषेच्या गर्भाशयातील शाई
गाणे ध्वनीच्या गर्भाशयातील आवाज
नाचणे देहाच्या गर्भाशयातील हालचाल
रंगवणे आकाराच्या गर्भाशयातील गती
ये सरस्वती मती
कर उघडे तुझे गुप्त झालेले पाणी
आणि
ह्या नागड्या आसमंतात
काढ पक्षाच्या अंगावरचे कपडे
त्यालाही माझ्याप्रमाणेच तुझ्या गर्भाशयातून आंघोळ घाल.
घाल त्याच्या डोळ्यात सृजनाचे काजळ
आणि माझ्या स्वातंत्र्याचे वादळ
त्याच्याही काळजात वाहते ठेव

॥२॥

पक्षाच्या काळोखात
तुझे उघडे झालेले अंग
प्रकाश होते
भिंतीच्या नाकपुड्यातून
तू सोडलेले श्वास
आकाश होते
तुझ्या बिंदूतून माझ्या बिंदूत
जे वाजले रक्त
त्यात होती स्वातंत्र्याची सिंफनी
तुझ्या त्वचेतून माझ्या त्वचेवर
जो सांडला घाम
त्यात होता मोक्षाचा ऑर्केस्ट्रा आनंदाची हार्मनी
गर्भाशय गायब झालेल्या
ह्या पोट सुटलेल्या आसमंतात मी
बसलो आहे एकटा उदास
साऱ्याच स्त्री-पुरुष संबंधाचा अस्त
मला दिसतोय थेट
आणि कोणत्याही अपत्याला जन्माला न घालता आलेल्या या वीर्याच्या थेंबात

पक्षाचे क्रौर्य हसतंय खदाखदा
रूततंय त्याचं हसणं माझ्या अंगागात अहंकाराच्या खांबात

॥३॥

खून करून जीवदान देणाऱ्या पक्षाच्या तऱ्हा
आखून दिलेल्या कृतीतही मला आढळलेला मोगरा
मी जिथे घमघमलो
तिथे होता तुझ्या देहाचा गंध
मी जो पक्ष लोकात वाटला
तिथे अत्तराचा दरवाजाही होता बंद
वाढत चाललेला हा समाजाचा धोतरा
मी आता कसा करू सुगंधित
कशी शोधू कस्तुरी
शहाजोग शहामृगात

॥४॥

बाया येतायेत
स्तन उघडतायेत
गर्भाशय वाढतायेत
ज्या अवयवात वीर्य वाजते तो अवयव गेला कुठे
ज्यात रंगमंच गर्भार असतो तो अभिनय हरवला कुठे
बाया येतायेत
स्तन उघडतायेत
गर्भाशय वाढतायेत
जी पौर्णिमा आपल्यात वाकली
अॅडमईव्हने चाखली
ज्ञानात फाकली
ती पौर्णिमा गडप झाली कुठे
जे चांदणे देहात वाजले
स्पर्शांत भाजले
त्वचेत माजले
ते चांदणे गुप्त झाले कुठे
बाया येतायत
स्तन उघडतायत
गर्भाशय वाढतायत
तरी माझी थाळी रिकामी का ?

॥५॥

जे होऊन गेले
ते कवितेत सापडते
जे होणार आहे
ते विज्ञानात नाहीसे होईल
ह्या क्षणी मी आहे
मी आहे सृष्टी आहे
सृष्टी आहे प्रतिसृष्टी आहे
प्रतिसृष्टी आहे चिन्हसृष्टी आहे
सर्वत्र व्यवस्थेचे खून आहेत हल्ले आहेत
बलात्कार आहेत काळाबाजार आहे
प्रत्येक मितीकात पृथ्वीची जाहिरात
प्रत्येक क्रयवस्तूत हत्येची छपाई
प्रत्येक पक्षाच्या बाजारपेठेत लिलाव
प्रत्येक कार्यकर्ता हंगामी क्रयवस्तू
माझ्या मृत्यूच्या प्रतिक्षेत प्लॅस्टिकच्या थैल्या
आणि
ओझोनच्या थरातून नाहीशी झालेली तू
जिथे पर्यावरण श्वास घेईल
तिथे तुझ्या गर्भाशयातील हवा असेल का ?

॥६॥

तू येशील तू न येशील
तू पोट घेऊन येशील तू पाठ करून निघून जाशील
तू मी मी तू
दोहोत पक्षाचा अद्वैती हुतूतू
जो संभोग आऊट झाला त्याला कर पुन्हा वाहता संत
जो संभोग अजून खेळतोय त्याला ठेव पक्षात जिवंत
जे गर्भाशय मारेल शिटी
त्यालाच नेम आयुष्याचा पंच
आणि त्यानंतर शिल्लक राहिल जो संच
त्यात मला टाक जाळून
मी वाजेन वीणेसारखा मृत्यूत
तू सरस्वतीसारखी रहा तयार काळजात
मी छापला जाईन नोटेसारखा कवितेत
तू लक्ष्मीसारखी उमल उभ्याने कमळात.

पक्ष - २

।।१।।

नसेल साऱ्या संहितात माणसाचा अनाथ मृत्यू
असेलही संहिता
जिच्यात असेल ईश्वराची बासरी

नसेल साऱ्या पक्षात टोळ्यांच्या टोळधाडी
असेलही पक्ष ज्यात उगवेल
कमळांचे पीक कल्याणकारी

संहिता आणि कृती
व्यवस्था आणि नीती
दोन जुळ्या तलवारींच्या कार्यकर्त्या मस्तकरीती

मी नम्र साक्षात्कार घेऊन
लव्हाळ्यासारखा लवचिक अश्वत्थ पिऊन

जे सूर्य मी शोधले ते पक्षात वाटू कसे ?
जे बुद्ध माझ्यात जन्मले ते लोकात वाढवू कसे ?

।।२।।

पक्ष
लोकशाहीचे वक्ष
कार्यकर्त्यांचा कडबा खाऊन मतदारांना टेक्शुअल दूध देणारे
नेते
तृष्णांचे शेतकरी
चिन्हांची शेती करून बर्फात सत्ता पिकवणारे
मी आणि कार्यकर्ते
पक्ष आणि नेते
आम्ही जित ते जेते
मी अग्नीचा जलतरंग वाजवत मांडली बर्फाशी लढाई
भुकेचा तबला बडवत बदडली बदलांची बढाई
परिवर्तनाची प्रत्येक अफवा मी धुऊन टाकली सत्याने तलम
जिथे स्वातंत्र्य जखमी झाले तिथे भरले मी मलम
पण पक्ष तसाच
कार्यकर्ते तसेच

मी चक्रधर झालो तर पारध्यांना शरण ससेच
मी नंतर पाहिला मांसाहार
आणि खाल्ला माझ्या देहाच्या शाकाहारी असहाय्यतेचा भात
जोढेकर मी दिला त्यात होती बुद्धांची आत्महत्या
गांधींची हत्या

॥३॥

मी कुठे जाणार कुणास ठाऊक
विश्वाच्या थिएटरमध्ये साक्षात्काराचे कपडे चढवून मी उभा
माझ्या चेहऱ्यावर करुणेचा मेकअप
निर्वाणाची अफवा
केवळ हवा झालेल्या वास्तवतेत
मी शोधतोय अभिनयातून गारवा
बुद्धाचा एकेक जन्म मांडत
एकेक मृत्यू सांडत
जो व्यापारी स्टेजवर मेला तो अमेरिकेतील भांडवलदार होता काय
जो महारोगी अभिनय करून गेला तो राजकीय नेता होता काय
जी आंधळी स्टेजवर एक डोळा मागत फिरली
दोन डोळे मिळवून गेली
ती कुठली शासकीय खेळी होती काय
स्टेजवर जी चिता जळली त्यात कोणाचे प्रेत जळले
बुद्धाचे की माझे
साऱ्याच प्रश्नात मृत्यूचा वास
साऱ्याच शक्यतात पुनर्जन्माचे अत्तर
माझ्याजवळ उत्तर नाही
प्रेक्षागृहात उत्तर नाही
सर्वचजण रिकाम्या खुर्चीसारखे
असण्याला पारखे
वनण्याला सारखे

॥४॥

वर्षामागून वर्षे
दशकामागून दशके
शतकामागून शतके
एका राजहंसाभोवती करोडो बदके

बुद्धांची हाडे तीच खाणारे कुत्रे तेच
बुद्धांचे डोळे तेच गॉगल बनवणारे गॉगलकार तेच
जिथे काळ आंधळा
आहे अवकाश पांगळा
तिथे सत्याचे जनेटिक कोड मांडून
मी वास्तवाचे ऑपरेशन करतोय
विश्वाला उपलब्ध होत
पक्षामधून नाहीसा होतोय

॥५॥

बंदुकीची गोळी भगवी झोळी
दोघात कवितेची हिरवी रांगोळी
क्रांतीची मिझाईल्स शांतीचे सॅटेलाईटस्
दोघांत शब्दांचा रक्तबंबाळ बुलफाईटस्
पक्षांची खुराडी स्वातंत्र्याच्या कोंबड्या
दोघात रुपकांच्या पोरी शेंबड्या
आता इथून पुढे जे होईल युद्ध
त्यात सर्वत्रच मी असेन
जिथे होईल अफवा विजयी
तिथे सत्यात बुद्धासारखा बसेन.

## गर्भाशय

॥१॥

विश्वाला नसतात भिंती
पुनरूत्पादने घडतात भिंतीआडच
सांत आणि अनंत
घर आणि परमेश्वर
ही विश्वाची आणीबाणी
हे युनिव्हर्सल केऑसचे वरखाली होणारे पाणी
अनंत लागते मागे शिकाऱ्यासारखे सांताच्या
आणि सांत थरथरत उभे राहते सावजासारखे गर्भाशयाच्या आडोशाला

जे गर्भाशय करून जातात पार
त्यांना मोक्ष देऊन नाहीसे करते अनंत
आणि जे गर्भाशयाच्या आडोशालाच उभे राहतात

ते भोगत राहतात आपले पुनर्जन्म
वाट बघत आपण कधी होणार संत

।।२।।

गर्भाशय असते आपल्या आयुष्याची सुरवातीची ओळ
आपला सांत प्रवास सुरू होतो तिथूनच
मोक्ष नाहीसे झालेल्या ह्या आयुष्यात
गर्भाशय हेच असते स्वातंत्र्य
तेच असते पृथ्वीची नीतीमत्ता
म्हणूनच शासनसंस्थानी जेव्हा मांडली माझ्या बालपणातच आणीबाणी
बापाला टाकले तुरुंगात
आणि आईचे गर्भाशय काढून घेऊन तिला केले दीनवाणी

तेव्हा मी भाजला गेलो
भाजला गेलो प्रशासनात
पोलिसात राजकारणात
आणि खाटिक बनलेल्या लोकशाहीकडून
बकरीसारखा कापला गेलो

।।३।।

माझा लोकतांत्रिक मृत्यू
हाच होता माझा साक्षात्कार
माझे सावजासारखे थरथरणाने घर
हेच ठरले शासनसंस्थेविरूद्ध लढणारे माझे हत्यार
मी घराची भिंत ढालीसारखी उभी केली
मी माझे आढे पोलिसांच्या टाळक्यात हाणले
मी
ॲना फ्रँकसारखी इनोसंट डायरी नाही लिहिली
मी तलवारीच्या धारेने चार पुलिस आडवे केले

।।४।।

किती रक्ताची उलटून गेली पाने
किती दंडुक्यांच्या सोसल्या मी यात्रा
किती माझ्या गांडीने पचवले तिखट
किती माझी वर्षे बर्फाच्या लादीवर गोठून गेली सोसत कट
जे क्षण उगवले

त्यात होता शासनसंस्थेचा तिसरा डोळा त्याचे दुहेरी कावे
जे क्षण मावळले
त्यात होते माझ्या प्रेताचे डावपेच प्रेमाचे पुरावे

॥५॥

माहेर नाही की सासर नाही
ह्या आसमंतात श्रद्धा ठेवावी असे परमेश्वराचे पाय नाहीत
म्हणूनच तू आलीस तेव्हा
मी जोडली तुझ्या गर्भाशयाशी नाळ
आणि
कोसळलो बनून काळ
काळावर आणि वेळेवर
शासनावर आणि शासितावर
मी गाऊ लागलो अंगाई
तू बनू लागलीस आई

॥६॥

तुझी माझी ही कहाणी
थोडासा विस्तव थोडेसे पाणी
तू निघून गेल्यानंतर पडलंय
आजारी माझं घर
आजारी अन्न आजारी चूल
आजारी विस्तव आजारी मूल
कोणत्याही क्षणी ह्या घरी मृत्यू होईल
कोणत्याही क्षणी ह्या घरातून काहीतरी कायमचे नाहीसे होईल
मी फक्त पाहतोय
कधी मुलाला
कधी स्वतःला
कधी शस्त्राला
क्रमशः टप्प्याटप्प्याने
आमच्यापैकी घरामध्ये कोण टिकून राहील
आमच्यापैकी घरातून कोण नाहीसे होईल

॥७॥

प्रत्येक आयुष्य आणते स्वतःसोबतच
जिवंत राहण्याची ईश्वरी तलफ

नाहीसे होण्याची एक गुप्त युक्ती
प्रत्येक पेशीत आयुष्याची शक्ती
आत्महत्येची भक्ती
मुलाला दफन केल्यानंतर
उरत नाही बापाच्या हातावर मृत्यूचा डाग
पाण्यात शांत होते आईची आग
गर्भाशयाचा राग अश्रूत वाहून जातो

॥८॥

आईच्या गर्भाशयातून माझे येणे
आईचे गर्भाशय नाहीसे होणे
एका स्त्रीचे आयुष्यात येणे
एका स्त्रीचे आयुष्यातून निघून जाणे
एक मूल आयुष्यात जन्माला येणे
एक मूल आयुष्यातून कायमचे नाहीसे होणे
मी करोडो पावसाळे पाहिले
मी करोडोदा स्वत:स पिकवले
मी करोडोदा कापणी केली
मी करोडोदा मृत्यू पत्करले
करोडो जन्म भोगून मी आता शांत
करोडो युद्धे सोसून माझे शस्त्र निवांत
घर माझे वसले आहे
बुद्धासारखे पद्मासन घालून
आणि मी भैरवीसारखा
नाहीसा होत चाललोय
सांतातून
गर्भाशयाच्या पार
आयुष्याच्या पारावरून

## हौतात्म्य

॥१॥

माझ्या अस्तित्वाची सांत तळटीप
फुटलीच तुझ्या स्तनात होऊन समग्र
तर करू नकोस बन्द देहाचा ग्रंथ
लढाईतील वार लढाईतील जखमा

खेळल्याच भुकेशी हमामा
तर करू नकोस दोनवेळचे जेवण बंद
उपवासाच्या तिथीत जगतो कार्यकर्ता
उपवासाच्या तिथीत मरतो कार्यकर्ता
सुखहर्ता विघ्नकर्ता सर्वत्रच असतोच

॥२॥

पृथ्वीचे उगमस्थान मला नाही माहीत
पृथ्वीच्या हत्येचा कट स्पष्टच दिसतो सराईत
तुरुंग मांडून जे साजरे करतात स्वातंत्र्याचा उत्सव
पाठीच्या कण्यातून जे काढून घेतात विस्तव
मी त्यांना नकार देतो
नकार देतो त्यांच्या महासिद्धांताना
ठोकरतो त्यांच्या सार्वजनिकीकीरणाना
आणि वैयक्तिक कर्माची कुंडली मांडून
फळाची अपेक्षा न करता लावतो झाडे
नाकारत रोमॅण्टीसिझमचे रिवोल्यूशनरी पाढे

॥३॥

ते येतात
तरी ते येतात
तुझ्या स्तनातून माझ्या देहात
उठाव करत अस्तित्वात
रोमॅण्टीक रिवोल्यूशनचा
ईवोल्यूशनची एकेक फिशकेस मांडत
सादर करतात पाण्याची वशीकरण विद्या
आणि माश्यांनी वश व्हायला नकार दिला की
माझ्या देहाच्या जलमंदिरात लाल चिपळ्या वाजवत बसतात

॥४॥

अवकाशाच्या अंगवळणीचं पडून गेलंय युद्ध
मी झालेलो नाही पुरेसा बुद्ध
मलाही ऐकू येतात कुटुंबाच्या हाका
समजू शकतो मी घराची अपरिहार्यता अंगणाचा झोका
स्वतःच्या मुलाचा स्पर्श

असू शकतो क्रांतीइतकाच उबदार
हगण्यामुतण्यात असू शकते पृथ्वीची घनदाट माया
ईश्वरेच्छा असू शकते बायकोची काया
म्हणूनच कुटुंब कबिला भेटला की
मी करत नाही त्याचा द्वेष
फक्त स्त्री-पुरुषांच्या पाठीत भरतो युद्धाचा त्वेष
आणि मुलांच्या मेंदूतील वितळवतो
कंडीशनींगचा वेष
त्यांची नग्नता हीच माझी रेष असते

॥५॥

विश्वाच्या रंगमंचावर करताना काम
मी संवादाऐवजी फेकले ओठ चुकून विनाहेतू
आणि प्रेक्षागृहातील प्रत्येक आसनस्थ प्रेक्षकाचा झाला मृत्यू
तेव्हापासून मी कधीच कुणाला माझी व्यक्तिरेखा समजून घ्या
म्हणत नाही
ज्याच्या त्याच्या भूमिकेत
आहेत ती फुलपाखरे जोपासा म्हणतो

॥६॥

मी अपूर्ण
तू अपूर्ण
दोघात अद्वैताचे चूर्ण
मला सापडत नाही माझी समग्रता
तुला कळत नाही तुझी अपूर्णता
तू फक्त येत राहतेस
टोळी घेऊन गोळी घेऊन
आणि तृष्णांच्या लिला मी सांगू लागलो की
दडून बसतेस कुटुंबाच्या शिळेत पक्षाच्या शाळेत

॥७॥

तू टोळीचं अंग त्या अंगावरचे कपडे
मी टोळीतून मोकळा माझे आयुष्य नागडे
तरी आपण भेटत राहतो

हद्दपारीच्या आसमंतात
बंदुकांच्या टापूत स्वातंत्र्यासारखे स्वातंत्र्यास पारखे

॥८॥

तू डॉक्टर होणार
असं मला कळलंय
हो
ह्या आजारी प्रतिसृष्टीत बांध तुझा दवाखाना
आणि
तृष्णांवर तात्पुरती ऑपरेशन्स करून बरे करत रहा
टोळीचं शरीर तिचा अंकगणिताचा मयखाना
माझ्याकडे लक्ष देऊ नकोस
मी अडाणी अनंत पाणी
अंकगणित म्हटलं की आयुष्य चुकणारे
पृथ्वीची महापाठ फिरेल तसे वाहणारे
माझी पर्वा करू नकोस
माझ्याकडे लक्ष देऊ नकोस

॥९॥

पुरुष आणि स्त्री
स्त्री आणि पुरुष
उरसाचा उत्सव
उत्सवाचा उरूस
झाड आता टोळीतून माझ्या स्वातंत्र्यावर गोळी
कुटुंबाच्या टिंवाटिंबात अडवून ठेव माझी रेषा
आणि पृथ्वीला सर्कल समजून वाढव
आयुष्याची त्रिज्या
जे भूमितीपलिकडे राहील
त्याची करू नकोस पर्वा
फक्त व्याकुळ झालीस तर उचल
महासिद्धांतांचे व्हायोलीन विकल
आणि अश्रू येईपर्यंत वाजव त्यावर माझे हौतात्म्य
माझा मृत्यू चांगलाच वाजतो
जाणतेसच

## लढाई

॥१॥

बदलत जातात शस्त्रक्रिया
बदलत जातात शल्यविशारद
बदलत जातात देह
बदलत जातात उपकरणे
टिकतं ते फक्त गर्भाशय
आयुष्यातून आयुष्य फळवत
सांतातून अनंत पळवत
मृत्यूला चिडवत जळवत

॥२॥

कुठल्याही बैठकीत
माणसांचे अवयव उधळले गेले
तरी उसासत नाही आताशा मी
ऑपरेशन टेबलच्या आसपासच असेल
एखादं सृजनशील गर्भाशय
ही जाणच प्रगल्भ बनवते मला
म्हणूनच डरत नाही मी
पोलिसांनी डॉक्टरांच्या गुदद्वारात
तिखट घातले तरी
फक्त निर्विकारपणे पुन्हा
इस्पितळाचीच मांडणी करतो
घेऊन जातो एखादी नर्स संभोगोत्सुक
आणि करतो संभोग
ऑपरेशन थिएटरमध्ये
शांतपणे

॥३॥

बाळंतपणानंतर काय होणार
हा प्रश्नही विचारत नाही मी
मुलगा की मुलगी
हा प्रश्नही गौण असतो अपत्याबाबत
मात्र ते पोलीस बनणार की डॉक्टर

ह्या प्रश्नाने अस्वस्थ होऊन जातो मी
कधीकधी वाटतं
ते पोलीस झालं तर
तर उठेन मी माझं
म्हातारपण सांभाळित
अडवेन माझ्या काठीचा मृत्यू होईपर्यंत
त्याचा पोलिसी दण्डुका
आणि जमलच तर मारेन ठार
ह्या ऑपरेशन टेबलवर
थंडगारपणानं

॥४॥

त्या लढाईला तरी अर्थ असेल का
मला नाही माहीत
मला इतकेच कळते
मी इस्पितळात असतो
तेव्हाच जिवंत असतो.

**पक्ष -३**

॥१॥

पक्षातील पक्षघात स्वीकारून बसलेले योद्धे
त्यांच्या मांसाला नव्हता कसलाच चेहरा
त्यांच्या नाकांना नव्हता कसलाच वास
मला अजून कशी सर्दी झाली नाही हा तुझा प्रश्न
उत्तर म्हणून माझं ताठलेलं शिस्न
मी तुला उचललं पक्षविरहीतपणानं
माझे कार्ड तुझ्या गर्भाशयात फेकून
तटस्थ

॥२॥

ही अराजकता पेलण्यासाठी अेक करावं
पक्षाचं स्थापत्य फोडून
त्याचा करावा क्रूस
आणि देहाचे अवयव सोलून काढून

तो लटकवाला क्रूसाला
तुझी शिकवण
आजही ताजी
त्यामुळंच मला लटकावायला धडपडतात ते
शपथ घालतात बापाची
तरीही मृत्यूकडे पहात
माफ कर वगैरे म्हणत नाही मी
आपल्या क्रूसाची नोंद व्हावी
असं बायबल असतंच कुठं ?

॥३॥

पक्षाचा अजस्त्र जवडा फाकला
आणि तू परतू लागलीस मागल्या दाराकडं
मागील दार
पाठीत वार
हेच तर होत आयुष्याचं सार
मी गन उचलण्यापूर्वीच
तू झालीस अणू
आणि त्यांनी पेशी वेचून वेचून
ठार मारलं तुला रेणू रेणू
माझ्या नकळत
तुला सारं कळवत
पण तू अधास्त
तुला हवंच होतं जणू माझं गोश्त
तू वळलीस
पक्षात फळलीस

॥४॥

पक्षाने पुन्हा एकदा हिसकावलेयत दोन कार्ड
त्यांच्या हातांना म्हणे
अध्यात्मिक घाम आला
मी पक्षाला काय सांगू
शेवटी त्यालाही गणेशोत्सव हवाच असतो
आणि विसर्जनासाठी
एखादा माणूस

## पुनर्वसन

॥१॥

माझ्या सत्वालाच टारकन फाडणारी
तुझी भयंकर तडजोड
माझ्या प्रत्येक खांद्यातून उचकटवते
नितीची मांडणी तिचा अध्यात्मिक कोड
अस्तित्वाचा प्रत्येक अवयव
फुंकर घालतो
स्वतःच स्वतःवर स्वतःसाठी
प्रयत्नांना अंत नसतो
आत्मविराण क्षणांना फुटतात जिभा
ज्या सांगतात
बुद्धाचा गळा बोधींनी दाबल्याच्या कथा
गर्भाशयाच्या एका कोपऱ्यात
अंग चोरून पडतात माझे जन्म
आणि अेकाअेकी तडकते
माझे पर्यावरण

॥२॥

तू येत राहतेस
येत राहतेस
येतच राहतेस
जमतच नाही टाळणे तुझ्याशी संभोग
माझा भोग
इकडचा अवयव तिकडं वळतो
तिकडचा इकडं
इतकं आणि एवढंच
पण अर्थ असा नसतोच
ह्या स्थलांतराला
वीर्याने गाभूळलेले माझे हस्तमैथुनाचे जांभूळ
टचकन फुटत मुक्त करते पिचकारी
आणि एकाएकी रडू लागते
कुटुंबव्यवस्था सारी

||३||

माणसं कोसळतात दिलाश्यासारखी
उतरतात ढग घेऊन खांद्यावरती
पाणी मागितले की वक्ष पाजतात बायका
घर मागितले की देतात गर्भाशय
पण तरीही मी असतो तसाच उपाशी
नाळ तुटलेला
कारण माणसांचा 'जमाव' केव्हा हाईल
ते सांगता येत नसते
आणि मी
गर्भाशयातून खाली सरकूच शकत नाही

||४||

हा असा मी अेकटाच
कुठंवर प्रवास करणार
मला माहीत नाही
किती काळ दाखवणार पायांना
क्रांतिच्या वहाणा
मला माहीत नाही
आत्मभान पसरते माणसात
जखमांचे कापूर जाळल्यावरच
हे सत्यही असेल
पण प्रत्येक रक्तवाहिनेतून
वहात नसते ना सामाजिक युग
नाहीतर बांधला असता मी हुतात्मा
प्रत्येक क्षणाला
घातली असती गोळी
प्रत्येक सुलतानाला
आणि केले असते मुक्त
एकेका तुरुंगाला
पण साधं टिकण्यासाठीही
किती कार्यकर्त्यांचे नैवेद्य दाखवायचे
हे निश्चित करू शकत नाही माझा बाप-काळ
तोडूही शकत नाही माझी
ह्या साऱ्याशी जोडली गेलेली नाळ

कधीकधी वाटतं
कागदपत्र बनत चाललेलं माझं हे असणं
व्हायलाच हवं बन्द
नाहीतर बेबन्द होत जाईल तुझी तडजोड
आणि मी
शिवाजीइतका दणकट नसल्यानं
गात बसेन नपुंसक पोवाडा
माझाही अखेर पडला गड जी जी जी
हो माझाही अखेर पडला गड

मी पुनर्वसन तरी कितीदा करायचं
स्वतःचं

## आईस

॥१॥

जठरातील अग्नीची एकही रेषा सापडत नाही
डोळ्यातील समुद्राचा एकही अश्रू प्रकाशत नाही
पायातील पृथ्वीचे एकही चक्र फिरत नाही
फुप्फुसातील वाऱ्याचा एकही श्वास हादरत नाही
मणक्यातील आकाशाचं एकही हाड गवसत नाही
मी फक्त भोवंडतोय
उसळतोय कलंडतोय
अगतिक मी अगतिक मी
केवळ शरीरात आत्मा खोदून
मृत्यूला पराभूत करता येत नाही जाणतो मी
केवळ योनीत वीर्य ओतून
विश्व उलगडता येत नाही मानतो मी
तरीही साधना देहात अंथरत का हे शब्द ताणतो मी
अर्थात का ह्या भणाणतो मी
काही काही कळत नाही
काही काही वळत नाही
सळसळत नाही फळत नाही
मी फक्त भोवंडतोय
भोवंडतोय कलंडतोय
अगतिक मी अगतिक मी

॥२॥

स्वतःच्या देहात लपलेल्या कर्माच्या खाणीतील
सोने शोधू पाहणाऱ्या यात्रिकाला तुम्ही काय म्हणाल
काय म्हणाल आईच्या गर्भात आपले
मागले जन्म विसरणाऱ्या पुत्राला
मी खरंच काही म्हणत नाही
किंबहुना काही म्हणूच शकत नाही
फक्त ह्यातील कुणाचे शब्द माझ्या मेंदूत ढगाळले
कि भरभरून कोसळतो
उसळतो फेसाळतो वळवळतो कळवळतो
अगतिक मी अगतिक मी

॥३॥

हे कसलं अजब एकाकीपण दाटतं माझ्या शरीरात
का हा असा एकटा होतो मी मित्रांच्या मैफिलीत
का त्यांचा माझा संबंध नाही
की त्यांचा माझा संबंध नव्हता ?
मग प्रश्नकुंडल्यांच्या संकेताना ओलांडून
मांडल्या ज्याने ग्रहदशा तो कोण
त्यांनी जेव्हा मागितली माझी पत्नी
तेव्हापासून पत्नीसहित दिल्या ज्यानं रखेल्या तो कोण
कसे गाभारले सारे देव माझे त्यांच्या चेहऱ्याच्या ताम्हणात
कश्या सांडल्या माझ्या दिशांच्या समीधा त्यांच्या चौमुखी वतनात
का त्यांचा माझा संबंध नाही
का त्यांच्यात माझ्यात बंध नाही
का मी फक्त ओसंडतोय भोवंडताय कलंडतोय
माझ्या शरीराच्या एकाकीपणात ?
का हा असा मी एकपात्री एकयात्री एकरात्री
का ? का ?

॥४॥

हे सारे काय आहे
हे सारं कुठून सुरू झालं
हे सारं कुठून संपणार आहे
आई

ह्या ओसपणाला कोणत्या अर्थाच्या कोषात सामावून घेणार होतीस तू
ह्या वाळवंटाला कसा काय हिरवा शालू नेसवणार होतीस तू ?
ह्या खाऱ्या समुद्राला कुठल्या जंगलातला मध पाजवणार होतीस तू ?
आई हे सारं कुठून सुरू झालं ?
आई हे सारं कुठं संपणार आहे ?
आई

।।५।।

प्रश्नांची ईद सुरू झाली की मी करत राहतो
रात्रभर माझ्या साधनेची कत्तल
त्याशिवाय पर्याय नसतो
विश्वाच्या गर्भाशयात परतण्याचा तोच एक मार्ग
हे ओसाडीचं महाकाव्य समजून घेण्याचा तोच एक उपाय
फिरत राहतो
फिरत राहतो माझा कोयता
पृथ्वीवर
आकाशावर
अग्नीवर
वायूवर
समुद्रावर
पण
जठरातील अग्नीत उ़र्जा माझी सापडत नाही
डोळ्यातील समुद्रात अश्रू माझा प्रकाशत नाही
पायामधील पृथ्वीत घुंगरू माझे वाजत नाहीत
फुप्फुसातील वाऱ्यात कविता माझ्या उमटत नाहीत
मणक्यातील हाडात अवकाश माझा उसळत नाही
उत्क्रांतीच्या वळणावरचा हा कोणता टप्पा
बदलांच्या राज्यातील हा कोणता प्रदेश
हे सारं नेमकं कुठं संपणार आहे
हे सारं नेमकं कुठून सुरू झालं
आई
माझं माकडहाड
नेमकं कुठं हरवलं
आई
माझं माकडहाड नेमकं कुठं हरवलं ?

## तू आलीस काय न आलीस काय

॥१॥

तू आलीस काय न आलीस काय
काय फरक पडणार आहे माझ्या आयुष्यात

तू आल्याने शक्य आहे की
तुझ्या देहातून प्रकाशाची उचलून चिमूट
पृथ्वी घालेल कवितेच्या अंगणात रांगोळी
नुसताच पोकळ असलेला हा अस्तित्वाचा गाभारा
राहील आजन्म गर्भार वेचून ही पोकळी
लाभेल पायांना दिशा आणि डोळ्यांच्या
असण्याला दिसणे
बाहेर पडेल कुंडलिनीत अडकलेला अभिमन्यू
शरीराचे सारे चक्रव्यूह बलदण्डपणे फोडून
पण ह्याने काय होणार
मृत्यूच्या पायाखाली क्षणार्धात चिरडली जाईल रांगोळी
विनाशाची गोळी लागून जख्मी होईल गाभारा
डोळे मावळतील काही दिसण्यापूर्वीच नसण्यात
आणि अभिमन्यूच्या शवावर
कसावसा उभा राहील ईश्वर मोडलेले सुदर्शन चक्र घेऊन
तू आलीस काय न आलीस काय
काय फरक पडणार आहे ह्या युद्धभूमीत ?

॥२॥

डोळ्यात प्रतिक्षेचं कितीही घातलं काजळ
तरी होत नसतो नष्ट काळोख
अवयवांच्या कुठल्याही गुणाकारातून
प्राप्त होत नसतो देहाच्या शून्याचा संबोध
अर्थ हरवत चाललेल्या आपल्या ह्या युगाला
सखे तू कोणाचे डोळे नेसवणार आहेस
देहावरची त्वचा उतरवून
कितीही नग्न होऊन पोहलीस तरी
लागणार नाही तुझ्या काळजाला ईश्वराचे पाणी
आणि तू तर मागत आहेस माझ्याजवळ ओली गाणी
तुला कुठून देऊ ती मी विराणी
सखे तू आलीस काय न आलीस काय

काय फरक पडणार आहे
ह्या आयुष्याच्या वाळवंटात

॥३॥

जन्माला अर्थ असतो
मृत्यूच्या विरामांचा
एवढंच कळत असेल संपूर्ण जगून तर
कशासाठी चढायचे हे
सृजनशील कवितांचे पहाड
जमीन खचत जाताना
सांभाळणार तरी कोण कुणाला
सांभाळीत स्वतःचे माकडहाड
त्यापेक्षा
विनाशाच्या ह्या कोसळणाऱ्या पावसात
सर वनून जा
माझ्या सोबत आत्महत्या कर
आणि उत्तर वनून जा

॥४॥

आत्मा आहे की नाही
हाच आहे या युगाचा खरा सवाल
तो नसेल म्हणून
टळत नाही जगण्याची वेताल निरर्थकता
तो असेल म्हणून
प्राप्त होत नाही विस्कळीतपणाला अध्यात्मिकता
सखे
हे कसले युग आहे आपल्याभोवती दाटीवाटी करून
हे माझ्यातील काय मरत आहे
आत्महत्येचे चमचा चमचा आचमन करून
कशी काय कोसळण्यापासून आवरशील मला
कशी काय नष्ट होण्यापासून सावरशील स्वतःला
तू आलीस काय
अथवा न आलीस काय
काय फरक पडणार आहे माझ्या प्रश्नात
माझ्या आत्महत्येत ?

*

# ७. बांधकाम चालू आहे

## बांधकाम चालू आहे (पूर्वार्ध)

॥१॥

बांधकाम चालू आहे
मयसभेचं बांधकाम चालू आहे

डाव्या डोळ्यात सूर्य
उजव्या डोळ्यात चन्द्र
कपाळावर काळ स्थापत
बांधकाम चालू आहे

डाव्या हातात थोडी गती
उजव्या हातात स्थिर रती
तळछातीवर नांगरत माती
बांधकाम चालू आहे

डाव्या श्वासात एक माकड
उजव्या श्वासात एक ईश्वर
फुप्फुसात माणसं घेत सोडत
बांधकाम चालू आहे

आता मागं वळणं अशक्य
अशक्य तिकडची टॉर्च इकडं आणून
इकडचा छिन्नविछिन्न लेख वाचणं
अशक्य इकडच्या दालनातला डोळा तिकडं न्हेत
अद्वैताचं चित्र काढणं
अशक्य इकडच्या तळघरात जोजवत ठेवलेली अंगाई
तिकडच्या गर्भाशयात ढकलणं

आता फक्त पहाणं
एक सुरचित बांधकाम
एक सुरचित हत्या
मुसाफिरा,
हे सारं वगळून
तू कुठं जाणार आहेस

॥२॥

ही मयसभा
तू नव्हतास तेव्हाही होती
तू आहेस तेव्हाही आहे
तू नसशील तेव्हाही असेल

ती आहे अमर
ती आहे अक्षर
ती आहे ईश्वर

तुझा नश्वर देह फिरवत
काय देऊ शकशील तू तिला
तुझ्या देहाला वजन नाही
आणि तिची पेशी देखील वजन होणारी

मुसाफिरा
काय देणार आहेस तू तिला
काय तू देऊ शकशील

॥३॥

तुझ्या नश्वर देहाचा अहंकार
पसर मयसभेच्या सतत फैलावावर
भरून घे एक श्वास
शांतपणे मरून जा
मुसाफिरा
बांधकामाच्या प्रत्येक भिंतीत प्रत्येक वीट काटेकोर
सिमेंट सिमेंट भरभक्कम
अनंत एफएसआय असलेल्या
ह्या बांधकामाला कसा
चिटकवशील अर्थ वा अनर्थ
श्वासाएवढाही नाही तुझा आकार
तेव्हा फुप्फुसाच्या ह्या प्रचंड धुडाकारात
ओमकार बोंबडवीत घे
तुझ्या देहाएवढा श्वास
आणि प्रवासाची हत्या करून
शांतपणे मरून जा

॥४॥

कुठून निर्माण झाली ही मयसभा
कधी प्राप्त झाले तिला गर्भाशय
कधी सुरू झाल्या तिला प्रसुतिवेदना
कधी मिळाली तिला सुईण

प्रश्नांना अंत नाही
मुसाफिरा
प्रश्नांना अंत नाही

आहेत त्या केवळ आठवणी

उत्क्रांतिच्या म्युटेशनच्या जनुकांच्या आदिकथांच्या

मुसाफिरा
आदिकथांना कधी ओळखलंस
त्यांच्या उलट्या भूतपायातील जोडव्यांना
कधी कानात जीव गोळा करून ऐकलंस ?
त्यांच्या डोळ्यातील भूतकालीन मांजराना
कधी वर्तमान स्तनातून वर्धिष्णू दूध पाजलंस ?
मुसाफिरा
कथात गळ टाकून बसलासच आमरण सोसत तुझे एकांत
तर कदाचित त्यामागचे सापडतीलही दृष्टांत
पण त्यासाठी तुला
करावा लागेल वर्तमानाचा जागर
सोसावा लागले स्वप्नांच्या मृत्यूचा आकांत
अन्यथा
वर्तमानाचा नकाशावरील तृष्णा भटकवतील
तुला भलत्याच प्रदेशात
आणि कथांच्या टीचभर पोटात सहज सामावले जाईल
तुझे शव
तुझे विश्व
तुझा वर्तमान
तुझे भविष्य

॥५॥

मुसाफिरा
मी गर्भार बायकांच्या जवळही
रहात नाही कधी उभा
त्यांच्या पोटावरून हात फिरवला साधा
तरी नाळेच्या तोण्डातून
वसकन भुंकत माझ्यावर मृत्यूचं कुत्रं त्याची बाधा
आणि भयाच्या टीचभर रिंगणात
मी लावून देतो स्वतःचं ब्रह्मचर्याशी लग्न
सोसत नाही मला बायकांचा आक्रोश नग्न
फूटभर सृजनांसाठी आकांत करतात त्या
विश्व गोळा करणारा
आणि लावून पणाला देह
मोकळा होत जातो गर्भाशयातील वारा
कुठलाही जन्म असतो तेव्हा गुलाम
कुठलाही मृत्यू सेवक
त्यामुळेच पोटाला भगदाड पाडून
झेपावलं पोरं
की मी देहात ओढतो माझा देह
आणि बाळाने फोडलेला टाहो
विश्वात पोहचण्याआधीच
भाजून घेतो जावळावर
माझ्या ब्रह्मचर्याचं लोह
माझ्या साधनेची तीच खूण -
तेच चिन्ह
मुसाफिरा
तीच खूण तेच चिन्ह

॥६॥

मुलांनो
संगोपनाच्या गोकुळात खेळताना
टिकवून ठेवा काळजात भूतकलीचा खेळ
साठवून ठेवा देहात मोहाची फुले

वसंताचे मद्य झाडांचा मेळ
खेळून घ्या मनसोक्त
मयसभेत खेळून घ्या

मयसभेत सर्वत्र खेळणीच असतात
त्यांच्या खेळासमोर द्यावाच लागेल बळी
तुम्हाला तुमचा दुधी दात
जीर्ण होऊन गळूनच पडेल बालपणाचा
निरागस हात

तेव्हा आतापासूनच देहात
गोळा करा खेळणी
भविष्यात तुमच्यासाठी
नवे खेळ कोसळतील

॥७॥

मुसाफिरा
सप्तपदीच्या प्रत्येक पॉजला
चिकटलेली असते भयाची माती
म्हणूनच साचत जातं पावलात
सुरक्षिततेचं पाणी
जे करतं संसार अनवाणी
खोटेपणाची चप्पल घालून
फिरत राहते जोडपे
करू लागते प्रेमाची हत्या बनत कोडगे
संभोगाच्या चिखलात लोळू लागते करुणा
शरीराच्या मातीतून उगवत नाही प्रेमाचे कमळ
आणि प्रत्येक माती सिद्ध होते मळ
ईश्वराच्या कुठल्याही अवयवात हिंडली
तृष्णेची गोगलगाय
तरी पोटात राहतात तिचे पाय
आणि विश्वभर प्रवास करून थकल्यासारखी
मरून जाते सप्तपदी नदीसारखी
प्रार्थनांचा जन्म अश्यावेळी होतो मुसाफिरा
प्रार्थनांचा जन्म असा होतो

॥८॥

मुसाफिरा
तू कुठेही जा
सुसज्जच असतात इमारती
त्यांची बांधकामे पोहचतातच
तुझ्या देहात सूरती
तुझे अवयव
तुझी बुद्धी
तुझे मन
त्या सर्वत्रच पोहचवतात भाडी
पोहचवतात गाडी
त्यांच्या स्तनांना माहीत
असते फक्त भूमिती
दूध देऊन सर्वांनाच खरेदी करतात त्या

रहिवाश्यांची कपाळं असतात त्यांच्याविना विधूर
त्यांच्यामुळेच आयुष्य बनते कडवट वा मधुर
तेव्हा मुसाफिरा
इमारती उधळण्यापूर्वीच सावध हो
त्यांना तू भाड्याने हवास
मुकाट्याने देऊन टाक तुझा देह

॥९॥

आयुष्याच्या एकांतात
नेहमीच अडकून पडलेलं असतं कैवल्याचं मृगजळ
अस्तित्वभर हिंडणाऱ्या तृष्णांना नसतो
कसलाच पोच
म्हणूनच मिळते एकांतातील तंबूला
कागदी सत्याचे वारे
आणि मातीत नाळ पुरून जन्माला आलेल्यांना
दूरचेच वाटत राहतात मोक्षाचे तारे
आईच्या दूधात नेहमीच मिसळलेली असते
रक्ताची साय
जगताना हिंसेला नसतो पर्याय
तीच असते छत्तीस कोटी जीन्स

पोटात घेतलेली गाय
तहान लागली की कापला जातो
नीतीमत्तेचा उंट
मयसभेतील शास्त्रज्ञाना मिळतात
एकांतातूनच संशोधनाचे सुरवंट
वासनांच्या पिसाट रंगात
रंगतात एकाकीपणाचे आदीम ब्रश
लोकनृत्याच्या आवेगांना प्राप्त होतो तृष्णांचा उन्माद तृष्णांचा क्रश
एकांताना मात्र
एकांताबाहेर कोणीच सोडत नाही
म्हणूनच माणसं सुरक्षित असतात
माणसांपासून

॥१०॥

कुठलेही विश्वोपनिषद वाचण्यापूर्वी
ग्रंथालयात जा

ग्रंथात असतात नेहमीच
तिरके जाणारे उंट
सरळ जाणारे हत्ती
अडीच घर हलणारे घोडे
एकच घर सरकणारे प्यादे
कसाही जाणारा वजीर
एकच घर हालणारा राजा
आणि जागा नसणारी मार्जिनमधली प्रजा

मुसाफिरा
ग्रंथ प्रजेचा असला तरी
कुठल्याही ग्रंथात असतात प्रशासन करत
वजीर मनसोक्त
ते नाकात प्रशासन करतात तेव्हा
ज्ञानाला होते सर्दी
ते कण्ठात प्रशासन करतात तेव्हा
ज्ञानाला होते टॉन्सील
ते तोण्डात प्रशासन करतात तेव्हा

ज्ञानाला होतो कॅन्सर
ते पोटात प्रशासन करतात तेव्हा
ज्ञानाला होतो अल्सर
तरीही एकेका अवयवाचा दवाखाना होईपर्यंत
प्रशासन करत राहतात वजीर
आणि प्रजेला एड्स होताक्षणीच
करतात घोषणा
परिवर्तनाची क्रांतिची

तेव्हा मयसभेतील सारे संभोग समजून घ्यायचे
असतील तर
विश्वोपनिषद वाचण्यापूर्वी ग्रंथालयात जा

वाळवी लागलेल्या शब्दातील एकेक हालचाल पठण कर
अवगत कर
माहितीच्या डोळ्यात प्रज्ञेची बोटं घालून एकेक शोध
कदाचित मगच
ऐकू येतील त्याच्या इथल्या जडणघडणी त्यांचे बोध
मुसाफिरा
हाताची घडी घालून सर्व पुस्तके रडतील
तेव्हा
पुसू नको त्यांचे अश्रू
ग्रंथ रडतात
हा ग्रंथाचा दोष नाही

शब्दांना वाळवी लागणे अटळ असतं मुसाफिरा
ग्रंथात बुद्धीबळ हिंडणे अपरिहार्य असते

॥११॥

कोणत्या सामूहिक मृत्यूचे व्याकूळ गीत गुणगुणतायेत
हे कळप
त्यांच्या नायकाला खरंच का सोसत नाही विनाश पेलण्याचे तप

नायकाच्या पूर्वजाला कशी बिलगली होती
आंधळी म्हातारी वैश्य चिता
शरीराचा वाघ करून कसा काय केला त्याने
काळजाचा ससा

हा नायक नसेल त्याचा वंशज त्याचा पलाश
चिकटला नसेल त्याच्या अश्रूला करुणेचा प्रकाश

मुसाफिरा
का रडत आहे कळप धाय मोकलून असा वनात
कोणत्या मृत्यूने गेलेत सर्व व्याकूळ होऊन ह्या उन्हात
पूर पाहू त्यांचे मृत्यू खालच्या अवयवात
म्हणावं
मृत्यू आहे म्हणून शाबूत आहेत तुमची लिंगे
लिंगे आहेत म्हणून टिकलीत तुमची माणूसपणाची भिंगे

संभोगाला नेहमीच असतो चिकटलेला
नश्वरतेचा मुलायम डोंब
म्हणूनच शरीराच्या धडधाकट आनंदाला फुटतो
पुनरूत्पादनाचा हिरवागार कोंब

उठ मुसाफिरा उठ
त्यांचे मृत्यू संभोगाच्या आनंदात पुरून उठ

॥१२॥

देह आणि पेशी
यांची रिलेशनशीप असते नेहमीच वेडीपिशी
कोण कुणामुळं पिसाळत कधीच नाही कळत
तरीही बण्डखोर पेशींना भेटलो की
गलबलून जातो माझा जीव जळत
सजीव जिवंत राहण्याचा अभिमान असतो त्यांना
स्वतःच्या नास्तिक अग्नीची पकडून शेपूट
जाळत राहतात त्या देहातील एक एक शव
त्यांच्या वर्धिष्णू डोळ्यात असते
परिवर्तनाची गती
जी स्पष्टच मांडते देहातील शोषक शोषीत नाती
स्वविकासाचा मोह पडत नाही त्यांना
कारण त्यांना असते अग्नीची शेपूट
म्हणून काटेकोर बांधकामात करतात त्या सुरुंगाची लयलूट
करतात स्फोट
पाडतात भिंती

पण मुसाफिरा
स्वतःच्या किडक्या दाढेत चघळते
देहाची मयसभा त्यांचे उठाव
आणि सापडतात त्या तळघरात
प्रकाशाच्या थारोळ्यात खात वडापाव
मयसभा त्यांना सोडत नाही मुसाफिरा
मयसभा त्यांना सोडत नाही

॥१३॥

कुठल्याही कलाकृतीपाशी थेंबभर ओला झालास
तर समज
तिथं कलावंताचा मृत्यू आहे पेलत उमज
मुसाफिरा
स्वमृत्यू म्हणजेच सृजन
रंगाच्या रेषांच्या शब्दांच्या सूरांच्या बोलांच्या दृश्यांच्या
कुठल्याही अवयवात
आढळेल तुला सृजनशील मेंदूचे आखील वैश्विक शव
त्यांच्या चिंतनाला नेहमीच लागते चिंता पर्यावरणाची
साधे झाड तोडले गेले तरी
झडू लागते पेशी त्यांच्या वातावरणाची
अशीच असतात त्यांची गात्रे
जंगलाच्या नासाडीने भयग्रस्त झालेली पात्रे
मुसाफिरा
तू त्यांना काय देणार
तू त्यांचे काय घेणार
तुझे हात पुढे सरकतील तर
होतील त्यांच्या तळहातात भूकंप
तुझी इंद्रिये विरघळत जातील
तर कोसळतील अहंकार पायाशी सकंप
मुसाफिरा
पुढे, फार पुढे सरकू नकोस
इतरांना श्वासाच्या अंतरावर ठेवूनच
जगू शकतात ह्या भयग्रस्त कलाकृती
तीच त्यांच्याअनुभवाची आकृती
मुसाफिरा

मयसभा त्यांना सोडत नाही
मुसाफिरा
मयसभा त्यांनाही सोडत नाही

॥१४॥

विसावा घे
पायांना प्राक्तनभर चालवलेस
तेव्हा विसावा घे
मृत्यूच्या कृष्णविवराकाठी नेहमीच सापडते
सृजनाचे ऑप्टिमिस्टीक धनुष्य
त्याच्यातून कितीही जन्म सोडले तरी
होणार नसतो कृष्णविवराचा शिरच्छेद
तेव्हा विसावा घे मुसाफिरा
विसावा घे
विवराची अपरिहार्यता स्वीकारून संपणार नाही
इथली दंतकथा
नसण्याच्या असह्य ताणातून तुला
विणावा लागले अवकाशाला सारा देह त्याची व्यथा
काळाची सारी काया पुसावी लागेल सतत तुला
त्वचेचा हातरुमाल करून
तेव्हा विसावा घे मुसाफिरा
पावलांना प्राक्तनभर चालवलेस
विसावा घे

॥१५॥

विश्रांतीच्या अमाप वरानंतर
प्रसन्न होत नसतात यमराज
त्यांनी दिलेल्या वरामुळं
फारतर क्षणभर टाळता येतो प्रवास
पण बांधकामाचंकाय मुसाफिरा
बांधकामाचं काय
अस्तित्वातील पहाड कापतच
तुला घ्यावा लागेल शोध
अस्तित्वाच्या मेंदूत कितीही औषधे घेत हिंडलास तरी
वरा नाही होणार तुला झालेला जिज्ञासेचा रोग

चल
पाळण्यात विज्ञान अंगठा चोखत पडलंय
त्याच्याभोवती बांध
काऊचिऊचं गान
लोंबकळू दे एखादं टिंगटाँग यान
येऊ दे येऊ दे
त्यालाही आसमंताचं भान
चल मुसाफिरा
अंगाई गायाला सुरवात कर
गा अंगाई
बन आई

॥१६॥

मित्रांची मोजदाद करू नकोस
शत्रु तर सारेच असतात
मैत्रीच्या मार्गावर
कडुनिंबानाही येत असते आंब्याची चव
स्नेहाच्या सणात असतो नेहमी आत्मदयेचा उत्सव
मुसाफिरा
मित्र येतायत
ते ढाळतील त्यांच्या दुःखाची अंग भरून रचना
गर्दावलेल्या आवाजात दिलाश्यांची आफीम ताजी कर
तयार ठेव
तुझ्या करुणेचे स्तन
त्यांना दूध पाजण्यासाठी
मुसाफिरा
येईल त्याला देत जा तुझे अगत्यशील डोळे
तुझ्या दुःखाचे परमार्थ होते
नेहमीच खुळे खिळे खुळखुळे
मुसाफिरा
देत जा
असंख्यात अनंतात
त्यांनी तुझे केलेले वध अनंत आहेत
त्यांची मोजदाद करू नकोस

॥१७॥

जन्माचा एखादा तरी तपशील
अर्थपूर्ण करता येईल का न गमावता शील
नको विचारू
नको विचारू ह्या बांधकामासाठी प्रश्न
बांधकामाला तर हवे आहे फक्त तुझे शिश्न
तेव्हा तपशीलांची रास रचून तयार कर तक्षशिला
वाढव मातीतून उगवू पाहणारी तृष्णांची तृणे त्यांच्या लीला
आणि
बुद्धाने चघळलेल्या काड्या चघळत
पुन्हा एकदा दुःखपूर्ण कर हे रान
आणि मग
विश्वभर उगवलेल्या गवताच्या जाती मोजत बस
धम्मचक्रप्रवर्तन म्हणतात ते हेच मुसाफिरा
निर्वाण म्हणतात ते हेच

॥१८॥

संवेदनांच्या अंगावर हिंडत असतो वाघ
सुक्ष्मशा छिद्रातून आरपार होतो हत्ती
ह्या वैश्विक जंगलाची तऱ्हा
चित्रविचित्र आहे सऱ्हदया
चित्रविचित्र आहे
मोकळ्या गळ्याने कितीही गायलास झाडे तरी
हाताला लागत नाही मनमोकळी गाणी
जंगलाच्या अवाढव्यतेत सामावला आहे एक वाद्यवृंद
हे सत्य असेलही
पण मुसाफिरा
कुठल्याही वाद्याला असतात तारा
तारांवर असते सूक्ष्म संवेदना
संवेदनाच्या अग्रावर असतो नेहमीच वाघ
आणि छिद्रातून पार होऊ शकतो अवजड हत्ती

मुसाफिरा
वाद्ये वाजली काय
न वाजली काय

शेवटी कुठलेही हात चिरंजीव नसतात
मुसाफिरा,
कुठल्याही अग्रावर वाघच असतात

॥१९॥

बेटं पाहून थांबलास
हरकत नाही
पण फार काळ थांबू शकणार नाहीस बेटावर
खरं आहे
बेटं असतात खण्डापासून दूर
बेटं असतात निसर्गाला आलेला महापूर
बेटं असतात बुद्धाचा एकांत
बेटं असतात तुकारामाचा आकांत
पण मुसाफिरा
त्यांना तरी टाळता येतो का समुद्र अशांत
लाटा येतच असतात
येतच असतात
येतच असतात
तुझ्या चहूबाजूला आहेत लाटांचे ताण्डे
किती करशील तुझा बचाव
किती खाशील बेटातल्या बेटात मांडे
नाही मुसाफिरा
क्षणभर थांबलास तर
क्षणभरच उसंत घे
आणि
इथल्या एकांताला तुझा आकांत नेसवून
निमूटपणे सोडून दे तुझ्या कविता ह्या लाटांत
समुद्रातील पाण्याला हिंसा येते मुसाफिरा
ते तुझ्या बेटांचा वध सहजपणे करू शकते
तेव्हा क्षणभर थांबलास तर
क्षणभर उसंत घे
आणि दे तुझ्या कविता समुद्राला
शांतपणे विनतक्रार
बेट
कितीही एकटं वाढलं तरी

शेवटी समुद्राचाच भाग असतं मुसाफिरा
मयसभेचाच भाग असतं

॥२०॥

पांढऱ्या झालेल्या केसांना
लावू नकोस कलप
पृथ्वीही म्हातारी होत चाललीये
तिच्या सुरकुत्यांना तू तरी जप
थकशील तेव्हा घे
न्यूटनच्या फळाची दारु
ईव्हच्या फळाचे मद्य
तेच तुझ्या आयुष्याचे सार
तेच तुझे सद्य
मुसाफिरा
काळाच्या कत्तलखान्यात तुझा देह पाठवण्यापूर्वी
आवरून घे त्वचा
आणि छिद्रातून फुटलेल्या घामात
एखादे ॲपल कुस्कर
एकदाच
एकदाच घे हा आहार
आणि हार मानून
घोषित कर विजयी तुझ्या पराभवाला
अरे तुझा अभाव
हेच होतं अंतिम सत्य
मुसाफिरा हेच होतं अंतिम सत्य

॥२१॥

सृजनाच्या कुठल्याही पातळीवर पोहचलास तरी
देऊ नकोस
कुठल्या अपत्याला जन्म
प्रेयसीच्या कटात होऊ नकास सामील
तिच्या सृजनाला आहे क्रौर्याचा वास
तेव्हा राहू नको गाफील
मुले जन्मत आहेत
जन्मू देत

मुले वाढत आहेत
वाढू देत
मुले नाचत आहेत
नाचू देत
मुले काचत आहेत
काचू देत
मुले साचत आहेत
साचू देत
लक्ष्यात ठेव
तिचे गर्भाशय आहे
अवघ्या विश्वाचा कट
तेव्हा सांभाळ तुझा तट
एकही फट कुठे राहू देऊ नकोस
कुठल्याही अपत्याला जन्म देऊ नकोस

लक्ष्यात ठेव
मयसभेवरील तुझा तो एकमेव जय असेल
मुसाफिरा
बांधकामावरील तुझा तो एकमेव जय असेल

॥२२॥

निवांत मरून जा
तुझ्या प्रवासाची हत्या करून
शांतपणे मरून जा
पण त्यापूर्वी तुझे सारे
सामान गोळा करून ठेव
बांध तुझी तिरडी
सजव तुझे शव
उध्वस्त कर घर
पाड भिंती फेक देव
जमिनीच्या ज्या चौकोनावर तू वाढलास
त्याला देऊन टाक
काहीही जन्माला न घालण्याचं तुझं कौशल्य
शेजाऱ्यापाजाऱ्यांना सांगून ठेव
शेवटी तेच होते तुझ्या असण्याचे साक्षीदार

तेच सांभाळतील तुझ्या नसण्यानंतरचा कारभार
मुसाफिरा
त्यांना सारं सांगून ठेव
काठ्या आंघोळीचं पाणी मडकं
सारं सारं तयार ठेव
सारं सारं आवरून जा
निवांतपणे मरून जा
मुसाफिरा
तुझ्या प्रवासाची हत्या करून
शांतपणे मरून जा

॥२३॥

भूक लागली मुसाफिरा
थांब
शिवू नकोस अन्नाला
आला आला
आला बांधकामातून नाहीसं होण्याचा क्षण
आकाशाकडे पाहून करू नकोस प्रार्थना
तिथं तुझा कुणीही बाप नाही
कुणालाच कळणार नाहीत तुझ्या संवेदना
चल काढ तुझी आतडी
तुझे जठर
तुझे हृदय
आणि धुऊन टाक ते अवयव
कपड्याच्या साबणानं
काढ आयुष्यात अेकदाच मिळालेला अंगाचा साबण
आणि मेंदूला प्रचंड फेस येईपर्यंत धू
आपट
आपट तुझं शिस्न
विश्वाच्या शिळेवर
पुन्हा पुन्हा आपट
आपट
आणि निवांत वाळत घाल मयसभेसमोर
तुझ्या इतर अवयवासहित
शांतपणे

ही मयसभा
तू नव्हतास तेव्हाही होती
ही मयसभा
तू नसशील तेव्हाही असेल

## कवीजन्म

॥१॥

कोणत्याही कवीच्या जन्माविषयी तुम्हाला काही हवं असेल
तर खुशाल करा तयार एक प्रश्न
उष्ण
कुणाकडे मिळेल भाषेकडे जाण्याचा नकाशा तीक्ष्ण
राजकारणी असं मिळालं उत्तर तर खुशाल शिरा कायद्यात
समाजकारणी असं मिळालं उत्तर तर खुशाल शिरा मानवशास्त्रात
वैज्ञानिक असं मिळालं उत्तर तर खुशाल शिरा गणितात
उद्योगपती असं मिळालं उत्तर तर खुशाल शिरा वाटाघाटीत
मात्र कवी असं उत्तर मिळालं तर शोधू नका नकाशा
कारण तो स्वतःच असतो एक स्वतंत्र भाषा
जिच्यात असते त्याचे आत्मचरित्र त्याच्या अस्तित्वाची अभिलाषा
काळीज आणि पाऊल अभिसरण आणि प्रवास जगणं आणि टिकणं
सूड आणि दया मत्सर आणि करुणा पशुत्व आणि मानव्य
आई आणि भार्या अहंकार आणि विश्व
एकमेकात उभयान्वयी जाळत
तो असतो स्वतःतच स्वतःला पाळत
म्हणूनच कोणी उत्तर दिलं कवी तर शोधू नका नकाशा
कारण अष्टौप्रहर असते नांदत त्याच्यात एक स्वतंत्र भाषा
फक्त शांतपणे शिरा कवितेत
तुम्हाला मिळेल कवीचा जन्म प्रसूतीचे संकेत

॥२॥

कोणतीही भाषा असते त्या भाषेतील कवींची चरित्रे त्यांच्या चारित्र्याने फिरवलेल्या टोप्या
आणि कविता म्हणजे कवीच्या चरित्राच्या तळटीपा
शब्दांना फुटलेल्या नीपा
त्यांची जागरणे त्यांच्या झोपा
त्यामुळेच भाषेत हिंडताना उडवलाच शब्दांनी गोंधळ तर नका विचकू
शब्द हेच आहे आपले माणूसपण म्हणून शब्द उलटले तरी नका उचकू

कारण शब्द असतो भाषा
शब्द असतो काळाने उलट्या हाताने सरकवलेला नकाशा
सुलट हाताने वाजवलेला काळजातील अवकाशाचा ताशा
तेव्हा शब्द भेटलेच तर समजा
इथे माणसे राहतात
करीत मजा
भोगीत सजा

॥३॥

पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत
उत्तरेपासून दक्षिणेपर्यंत
सर्वत्र पसरलेली असते भाषा
भाषेला असते रूप आणि रंग
पाणी आणि तरंग
गती आणि गंध
उर्जा आणि छंद
त्यामुळे भाषेचा उघडला कोणताही दरवाजा
तर खुशाल शिरा आत
कोणीतरी असेलच स्वागताला एखादी कविता गात
भाषा माणूस असते
माणूस भाषा

॥४॥

भाषेत सर्वच सज्ज असते
इस्पितळ बालवाडी शाळा कॉलेज
मैदान वृक्ष बाग़ा नॉलेज
रस्ते वहाने तळी विमानतळ
इमारती पेढ्या दुकाने गळ

सारेच एकमेकाशी असतात भांडत
एकमेकाला सांडत
एकमेकाला कांडत
म्हणूनच माणूस असतो जात्यासारखा जिवंत
भाषेतल्या भाषेत वावरणारा संत
उडी चुकलेला हनुमंत
दंतकथेतला दंत

॥५॥

कवी भाषेत जन्मत असतो तेव्हा भाषा असते सामसूम
तिच्या एकाही गल्लीत भुंकत नसते कुत्रे होत नाही मांजराची टामटूम
कवीच्या घरासमोर असतो उजाड अश्वत्थ
ज्यांच्या पानांना असतो माणसाचा वास
रक्तमय क्रांतित भिजून होतो लाल
अश्वत्थाखालचा दगड
दगडावरील दगडफूल
फूलामधल्या पाकळ्यांच्या झळा
मातीच्या नाजूक नाकात घुसत जातो नाळेचा वास
जो फिरवतो भाषेत द्वाही
कवीच्या आईला सुरू झालेत प्रसूतीकळा
काय नलीनीला प्रसूतीकळा ?
आता तरी तिला कवीच होऊ दे ग
अग कुणीतरी रिक्षा बोलवा
पाटलीणमावशी कुठं आहे
भांडीवालीला निरोप पाठवा
कवीची आई असते नेहमीच भाषेत लोकप्रिय
आणि तिचे पोट असते विश्वाचे माहेरघर
बायका होतात जमा
पुरुष लागतात कामाला
पाटलीणबाईच्या नथीत साजरा होतो उत्सव
तिच्या दोन्ही पोरींना येतो वास मांसाचा जळताना पहाटेचा विस्तव
एकाएकी विव्हळते कवीची आई तिच्या गर्भाशयाचे रूप
सारे चिडीचूप
करत जाते आकांताची धूप
रिक्षा येते दारात
पाठीमागे असते वरात
रिक्षा धावत जाते
भाषेतल्या रस्त्यावरून
रस्ते होत जातात मोकळे
रस्ते फेकून देतात व्याकरणाचे सोहळे
गच्चकन उलटली जाते रिक्षा
सांडते पुण्याची रस्ताभर भिक्षा
वाटते झालेच सारे दिवंगत

पण काहीच नाही संपत
पुन्हा उठून उभी राहते रिक्षा
स्वयंसिद्ध योद्ध्यासारखी घेत पुनर्जन्माची दीक्षा
आता तिच्या चाकाला फुटलेले असतात पंख
काळ्या चेहऱ्यावर पसरलेला उन्हाचा पिवळाफेक डंख
पण काहीच न जुमानता उसळत जाते रिक्षा
आता फक्त रिक्षाच नाही धावत
धावू लागतात रस्तेच उलट्या मार्गाने
रिक्षाला नसतो ब्रेक नसते हॅण्डल नसतो ड्रायव्हर नसते सुरक्षा
रिक्षा फक्त असते रिक्षा
आणि कवीची आई असते
एका कवितेची चालतीबोलती अग्निपरीक्षा

॥६॥

कवीच्या बापात असते गोठलेले दुकान
किराणा घराण्यात कवयत्रीच जन्मल्याने
धागे उसवत बसलेले असते त्याचे चेहऱ्याचे बारदान
तोलत श्वासात ताण
ठेवत दुकानातल्या तराजूत दोन डोळे निर्भान
तो उबवत बसतो निराशा
जाते फुटत त्याच्या ऑप्टीमिझमचे एकेक अण्डे
एकेक-डे होतो मण्डे
बायकोबद्दल काही वाटणेही संपवत चाललेलं त्याचं काळीज
मागील वेळेस दफन केलेल्या मुलाचे शव वीजेसारखं बाळगत
आळख्या दुकानातून हिंडत असते अनवाणी
त्याला दफन करताना हातांना झालेल्या जखमा
खेळत असतात नशिबाशी आणीबाणी
तो ऐकतो बातमीत
बायकोला प्रसूतीकळा सुरू झाल्याची उलाढाल
काळजात हत्तीसारखी झुलायला लागते उलाघाल
काळाची एकेक चाल
हालहाल करते
मुलगा की मुलगी
मृदुंग की हलगी
त्याच्या देहात उठाव करते बायकोबद्दलचे प्रेम

नेमसिक होत तो उठतो
घालतो गल्ल्यात होमसिक हात उचलतो नोटा
पेलत लाटा लाटा
येतो इस्पितळाच्या दारात
इस्पितळ असते शांत
त्याच्या शांताराम पावलात शांति पसरते
कुत्र्याचे भुंकणेसुद्धा ऐकू येत नाही कुणाला
दूरवरून रेंगाळत येणारी पेलत पहाट
फुटतो एक माठ
एक पुरुष ताठ
बाप बनतो

॥७॥

कुठल्याही गर्भाशयातील मुलाला काय वाटते कुणास ठाऊक
गर्भाशयात काहीच नसते बरोबर किंवा चूक
कवी गर्भाशयात असतो तेव्हा नसतो कवी
तो असतो
कुठल्याही झाडाला येईल असे सहज फळ
एक स्वच्छ जळ
एक पोकळ कळ
पायपिटीचा पडलेला पायात तळ
म्हणूनच तो गर्भाशयात हिंडतो तेव्हा
गर्भाशयाला होत नाहीत जखमा
सापडत नाही सृजनाने सुरू केलेल्या नाळेतला नळ
म्हणूनच कवीच्या आईला ऐकू येतात ते पदरव फक्त फळाचे
कवीचे नाहीत
म्हणूनच ती फळालाच समजावत बसते झाडासारखी कायबाय
स्वतःलाच आलेल्या चिंचा आवळे खात बनते आयुष्याची साय
तिला माहीत असते आत आहे तिची शक्ती नवऱ्यातला शिव
जो जिवंत करतोय एक आतडे एक मेंदू सजीव
म्हणूनच धडका बसल्याकी ती करते प्रार्थना व्रतस्थ
आणि तरीही तिच्यातले काहीतरी असते त्रयस्थ
ती फिरवते पोटावरून परमेश्वराचे हात जुळलेले
तरीही आतील डोळे मात्र असतात मिटलेले
आणि आयुष्य मात्र बाहेर येण्याची वाट पहात असते फळलेले

॥८॥

कवीला आवडते गर्भाशयात बसून पहायला
इस्पितळाभोवतालची शांतता
पाळण्यातली निवांतता
इस्पितळाच्या डाव्या बाजूला असते एक दुकान
उजव्या बाजूस थिएटर
समोर पेट्रोल पंप
पिछाडीला एक छोटा बोळ
इस्पितळाला नसते माहीत
किंबहुना वर काही आहे का
ह्याविषयी इस्पितळ असते साशंक
ते फक्त घट्ट पकडून असते खालच्या मातीला
सोसत तिचा डंख
कोणतीही गर्भवती दारात आली घेऊन पंख
की इस्पितळाचा उडतो गोंधळ
हलतात तळ
क्षणार्धात सावरली जाते हाताची छावणी
स्ट्रेचर्स गाऊ लागतात गतीची लावणी
वॉर्डबॉयला प्राप्त होते लय
आणि एक आई उचलली जाते पेलत तिचे वय
आख्खे इस्पितळ सामावले जाते तिच्या गर्भाशयात
गुणगुणायला लागतात कविता बाहेर आणि आत

॥९॥

प्रसुतीगृहाच्या कोणत्याही खोलीत हिंडले तरी सापडतात
औषधाच्या रांगा
असह्य वासाच्या बांगा
डॉक्टरांच्या हातांना वास येतो नियतीचा
त्यांच्या डोळ्यात नाचत असते
परमेश्वराचे वाचलेले पाऊल
त्याच्या घुंगरूंची अक्षर चाहूल
शस्त्रे कथ्थक नाचत जातात
स्वतःच्या चकचकीत त्वचा चमकवत
बांधत जातात लयीशी सेतू
जन्माचा ऋतू आयुष्याच्या झाडावर फुलवत

त्यांच्या पोटात असते एक जीवन
पाठीवर एक मरण
ती सरण कांडत कांडतच शिरतात आरपार
बाळंतिणीच्या पोटात धारदार
गर्भाशयाच्या तबल्यावर पडतात त्यांची बोटे गरम
एकेका पेशीवरचा हुसकावून लावतात बसलेला यम
आणि पाठीवरचे मरण देतात फेकून
कुठल्यातरी कृष्णविवरात मुलायम
एकाएकी गर्भाशयाला फुटतो बुद्धाचा चेहरा
जो दुःखाचा उठवतो पहारा
आणि कवी फोडतो टाहो गहरा
भाषाभर घुमतो त्याचा आवाज
आणि शब्दांनी उधळलेला गुलाल
आकाशस्थ होतो
पेलत सृजनाची गाज

॥१०॥

कुठलीही नाळ असते अवघ्या सृजनाचे चरित्र
पृथ्वीजवळ सांगावी अशी एकमेव सत्यकथा असते नाळ
ती असते म्हणूनच पृथ्वीवर विश्वास ठेवतात लोक तिन्ही काळ
गरज वाटेल तेव्हा ती देणार हमखास बाळ
तरीही जेव्हा जन्मतो कवी
तेव्हा शांत असते नाळ
तिची सजीवता कुठे नाहीशी होते हा प्रश्न पडत नाही कवीला
कारण त्याला नाळ तुटल्यावर जाणवते फक्त आतडे आतड्यातील भूक
आणि ओढायचे असते त्याला स्तनातून दूध
म्हणूनच जेव्हा तुटते नाळ
तेव्हा सारे जावळ खोलीभर पसरून
कवी फोडतो टाहो वाजवत काळ
आणि पृथ्वीची ओलाई ओठाच्या गोलाईत पसरली की
भिजवून घेतो जिभेचे वस्त्र
साय नसलेल्या दूधात
स्पर्शाच्या मधात
आपण सारेच असतो फक्त आतड्यात जिवंत
ही असते त्याच्या कळण्याची सुरवात

आणि प्रश्न पडत नाही त्याला ह्याचा काय अंत
आई सोबत असताना
आईत स्वतःला रचताना
म्हणूनच कवी सुखी असतो
आईच्या स्तनात हिंडताना
हे स्तनच असतात त्याची यात्रा
हे स्तनच असतात त्याची मंजील

॥११॥

कवीच्या आईला सांगते कुणी
मुलगा आहे ग
मात्र तुझ्यासारखाच काळा
तेव्हा ती हसते
काळा गोरा प्रश्न कधीच नसतो तिच्यापुढे
तिला ठाऊक असते फक्त तिचे गर्भाशय तिचा आनंद
कवी जन्मला म्हणून गर्भाशयाला भेट देणारे संत
कवीवरून हात फिरवताना
तिच्या भाग्यरेषेतून धावत हसतात हरणे
आणि तिच्या आयुष्यरेषेत हिंडणारे सारे वाघ
निमूटपणे अहिंसा शिकल्यासारखे
नाहीसे होतात - हृदयरेषेत
हे कसे घडते कळत नाही तिला
तिला एवढंच समजत
भाषेला हवा होता एक कवी
घुसळणारा रवी
तो आपण दिला
आता उलटून येणार नाही भाषा आपल्या गर्भाशयावर
निघणार नाही मोर्चा कुठल्याच स्तनावर
म्हणूनच ती होऊन तृप्त फिरवत राहते हात
कवीच्या देहासाठी अंगाई गात
नर्स येतात तिला बघतात जातात
त्यांनाही जाणवत असतो तिचा आनंद तिचा उत्सव
म्हणूनच सवड काढून बोलत बसतात त्या फुलवत काळाचा विस्तव
आणि अचानक नवी गर्भवती दाखल होते दारात
आणि सारे इस्पितळ गतिमान होते तिच्या ताज्या गर्भाशयात.

*

# ८. एकतर्फी

## कील मी

॥१॥

शब्द शब्द सोबत घेऊन
होऊन जातो मीच अब्द
धडपड करतो पोहचण्याची
तुझ्यापर्यंत मी स्तब्ध

माझ्या शब्दास नाहीत हात
नाहीत डोळे नाहीत पाय
माहीत नाही तुझ्यापर्यंत
पोहचण्याचे मला उपाय

श्वासात माझ्या तुझेच वास
जिभेत माझ्या तुझीच चव
डोळ्यात माझ्या तुझे चेहरे
मनात माझ्या तुझीच लय

तरी तू आहेस दूर
ठेवत स्वतःत माझा प्राण
स्वतःमध्ये होऊन चूर
बनवतीयेस मला बेभान

कुणासाठी जगतो आहे
कशासाठी जगतो आहे
तू आहेस माया तर मी
का असा तडफडतो आहे

प्रश्न प्रश्न करतो व्याकूळ
हातास लगडतात तुझे स्तन
लावतात वणवे आणतात पाऊस
विझून जातात वनवे क्षण

॥२॥

वासनांमध्ये तुझे चुंबन
इच्छेमध्ये तुझीच काया

समजावत मी राहतो स्वतःस
ही सनातन आहे माया

नष्ट करू पाहतो तुला
कष्ट कष्ट स्पष्ट करत
गळत राहतेस माझ्यामध्ये
तू सतत आणि अविरत

अस्तित्वाच्या पेशीपेशीत
विश्वाच्या राशीराशीत

रिवॉल्वर लटकवून स्वतःमध्येच
बॉम्बब्लास्ट घडवून आणतो
आत्महत्या हत्येमध्ये
आयुष्याचे धनुष्य ताणतो

तू नष्टच होत नाहीस
तू स्पष्टच होत नाहीस

फक्त आरश्यात जगण्याच्या
माझा एक चेहरा वारतो
जसा जसा शोधतो सत्य
तसा तसा अफवेत मरतो

॥३॥

नष्ट व्हावे तू म्हणून
काय काय करतो मी
राज ज्ञान कर्म भक्ती
सर्व योग भरतो मी

संभोग गायब होत नाही
तृष्णा होत नाही नष्ट
कुंडलिनीत बसूनही
आसक्ती होत नाही स्पष्ट

मांड्यात माझ्या तू नागवी
मेंदूत माझ्या तू नग्न
झाडतेस कुंडलिनीवर गोळी
बोधी माझा करतेस भग्न

कोसळून पाने होतो ठार
जातो चक्राचक्रात फाशी
दोन्ही घरचा पाहुणा बनून
दोन्ही घरी राहतो उपाशी

॥४॥

स्वर्गावरचा उडतो विश्वास
ईश्वरावरची उडते श्रद्धा
जडावरती जडते मन
अध्यात्मात बुडता बुडता

आकाशापर्यंत पोहचण्याआधीच
माती गांठते प्रत्येक प्रार्थना
आरतीसाठी वाजते वाद्य
वितळतात देवाच्या वल्गना

रडायचे असते मला पोटभर
गुडघ्यात पण रडत नाही
तुझा सहवास फ्रीजसारखा
माझे प्रेत सडत नाही

॥५॥

समजून घ्यावी हरेक स्त्री
आतून बाहेरून आरपार
म्हणजे तिला मारता येते
अलगदपणे सहज ठार

नष्ट करावी तुला म्हणून
संवेदनशीलता लावतो पणास
मुंगीएवढी मिळावी जागा
परमब्रह्माच्या अनंत कमळात

म्हणून मी धडफडतो आहे
व्याकूळपणे तडफडतो आहे
सावधपणे स्वतःमध्ये
उतरतो आहे चढतो आहे

तरीही ठेवत मला बेसावध
प्रार्थनेवेळी कापला जातो
आकाशातून तुझ्या अंगणात
अगतिक फेकला जातो

काय करू जाऊ कोठे
मरणाला ह्या नाही अंत
तुझ्यामध्ये गायब झाला
माझ्यामधला कोवळा संत

॥६॥

चालणार हे कुठवर सारं
माझं मला समजत नाही
माथ्यावरती माझ्या मेघ
डोळ्यात मात्र अश्रू नाही

एकीकडे तुझा द्वेष
दुसरीकडे तुझ्यावर प्रेम
दर क्षणाला बदलतो शॉट
दर क्षणाला बदलते फ्रेम

कितीवेळा जन्मतो मरतो
तुझ्यात त्याची नाही गणती
तुझ्या स्तनाचा माझ्यावर हल्ला
बनत जातो गूढ महंती

परतवू शकत नाही हल्ला
कारण मी काहीच नसतो
तू हवीस तू नकोस
दुभंगलेपणात जीव नासतो

॥७॥

हा जगण्याचा कोणता टप्पा
कुठून कुठे पोहचलोय मी
निवडीचेही स्वातंत्र्य
कसा गमावून बसलोय मी

आत्महत्या नाही पर्याय
स्त्रीहत्याही नाही शक्य
एकच पर्याय आहे शिल्लक
त्याचाच तू बनव हक्क

उचल कोयता फिरव आरपार
तुटू दे माझी धमनी धमनी
ठप्प होऊ दे सारी वाहतूक
एकतर्फी एकदाची

नष्ट होऊ दे कुंडलिनीतील
ही वीर्याची ओली वाढ
संपू दे सारं हे एकदाचं
होऊ दे माझा मृत्यू गाढ

होऊन जाऊ दे एकदाचा
अस्तित्व नष्ट करणारा प्रलय
तीच असेल माझी मुक्ती
तिथेच असेल जगण्याची लय

कृपया उचल उचल कोयता
गळ्यातून माझ्या आरपार फिरव
किल मी प्लीज कील मी बास्टर्ड
मार मला आणि मृत्यू मिरव.

## काय म्हणू

॥१॥

काय म्हणू
मला वाळवंटी
पाजलेस पाणी
आणि मारलेस
मला जीवे
काय म्हणू
समुद्री मला
बुडताना काढलेस
मग न्याहाळून
विहिरीत ढकललेस

काय म्हणू तुला सांग
मृत्यूमधून काय म्हणू ?

॥२॥

आलो नव्हतो दारात तुझ्या
कवचकुंडले माझी घेऊन.
डोळ्यामधील तुझ्या तुळशीस
निवडुंगाचे ना दिले ऊन

पाडली नव्हती कपाळी तुझ्या
कुंकवासाठी कधी जखम
घातले नव्हते पायी तुझ्या
जोडव्याचे जुळे भ्रम

का केलीस मग तू माझ्या
पाठीमध्ये प्रेमाची हत्या
भोसकलेस का गर्भाशय
लिंगात माझ्या तू निहत्था

का दाबलास माझा गळा
केसांचा तू करून मफलर
चेहऱ्यामध्ये माझ्या कोठे
मुखवटा तुला सापडला डफ्फर

का मारलेस मला जीवे
का विहिरीत तू ढकललेस
का केलेस तू असे
तूच सांग का केलेस

॥३॥

माणसे नेहमीच बोलतात खोटी
जगतात पोटी
होतात खोटी
नाणी आताशा
मनगटांना फुटावे पुरुषत्व
म्हणून रात्रभर
पिळतात मिश्या

लिंगामधले वीर्य मूठभर
आयुष्यभर
पुरावे म्हणून
अण्डरपॅण्टही घालतात जपून
हलतात जपून
चालतात जपून
मी नव्हतो त्यातला म्हणून
उलगडले माझे समग्र लिंग
मोजणार माझे होतीस तू
केससुद्धा जर लावून भिंग
दिली होती
मी परवानगी
विश्वासाने
अन् श्रद्धेने
का मग घातलीस
सुऱ्यास हात
काय होता तुझा हेतू
पाठीमागून
खुपसावा सुरा
म्हणून केसात
गुंतवलेस तू ?
का केलेस असे सांग
मृत्यूमधून मागतो उत्तर
का केलेस तूच सांग

॥४॥

कशा देऊ तुला शिव्या मी कोल्हापूरी
कशी काढू तुझी आयमाय
तुझा प्रियकर मी अंतरी
भावनांना होते सर्दी
शेंवडाची होते गर्दी
तीच शिवी
कशी वापरू
मी कवी
मी निरोगी

तुझ्या कानाचे कसे करू बेसीन
सभ्यतेने मारली पीन

कशी देऊ शिवी मी कोल्हापूरी
मी कवी बाहेर आणि अंतरी

॥५॥

प्रेमच का
माझी सारी
फ्रेम ॲबनॉर्मल
नाही फॉर्मल
माझा चेहरा
म्हणून कुंडल्या
असून पहात
हसत नाहीत
माझे ग्रह
वयात येतात त्याचे दुराग्रह
तेव्हाही त्यांना
नाही वाटत
करावा संभोग
ते फक्त
साधत योग
शोधत राहतात
संतति प्रतिबंधक लस
न होता टसमस
माझे प्रेम नसे बायकी
मराठी कवीसारखे नाजूक
मी पुरुषी हूक
म्हणून कुंडली पाहतानाही
मी पाहिले गर्भाशय तुझे
तन्दुरुस्ती घेऊन लक्ष्यात
मी देहाचे मोजले वासे
जुळवून कुंडली झालो रिकामा
बडा घर पोकळ वासा
तुझी माझी एकच नाडी
सेपरेट वाडी एकच गाव

॥६॥

त्याच्याशी करशील
आता संसार
त्याचे डोळे
होतील कॅनव्हास
त्याच्यात ओतशील
देहाचे तुझ्या
ढंगदार रंग
संगदार वास
देवदार नाक
गळेल तर
त्याला देशील
त्वचेचा रुमाल
चवदार ओठ
दुखेल तर
त्याला देशील
चुंबनाचा बाम
मागेल तेव्हा
देशील संभोग
सुशिक्षितपणे करशील योनी
प्रदान त्याला सुसंस्कृत मोनी
स्मरणार नाहीस
होतास केला पराक्रम गौणी
दोन वृषणे अपरा रात्रीत
एका योनीत करून म्यान
एका रात्रीत दोन स्तनात
दोन पुरुष होतेस खेळवले
आणि पळवले विझवीत स्वतःची
द्विस्वभावी तहान
अनमोल कसब
कुशल खेळ
अवयवांचा
फ्युजन मेळ
घेणार नाहीस
तुझ्या नलिकेत

शुक्रजंतू तू माझा
फेकून देशील प्रेमतंतू
वस्त्रामधूनी
दिवसाच्या ताज्या
फक्त झाली
यदाकदाचित
जुळीच मुले
तर एकाची मानून मिथ्या
करशील हत्या
कवचकुंडले काढून घेऊन
सोडशील त्याला
अंगणात माझ्या

द्विस्वभावी
राशीकडूनी
मी आणखी
काय अपेक्षू ?

## प्रतिक्षा

॥१॥

तू येणार नाहीस जाणतो मी
येणार नाहीस तू मानतो मी
नाहीच तू येणार समजावतो मी
समजून घेतो मी
नाही उगवणार पूर्वेतून रोमॅण्टीक सूर्य
पडणार नाही आयुष्यावर कुठल्याच झाडाच्या रोमॅण्टीक छाया
उभा राहीन तिथे वाळवंट होतील स्टेशनांची
अठ्ठावीस युगाची जाईल प्रतिक्षा वाया
उतरणार नाहीस तू रेल्वेमधून उतरणारी गर्दी गारद्यांसारखी
उगवणार नाही तुझा चेहरा दिसणारी खिडकी तुला पारखी
तरी मी उभा तुझ्या प्रतिक्षेत तुझ्या अपेक्षेत
किती काळ उलटला किती तास पालटले
किती वेळा माझे डोळे रेल्वेला लटकले
मला नाही भान मला नाही कल्पना
मी आहे वल्गना खऱ्या होण्याच्या प्रतिक्षेत

मला इतकेच माहीत आहे
मला आहेत दोन डोळे प्रतिक्षेसाठी
मला इतकेच जाणवत आहे
तुला आहे एक देह येण्यासाठी
ये

॥२॥

काहीच नाही आयुष्यात
तू आवर्जून यावं असं काहीच नाही
नाहीत घराला एशीयन पेण्टसच्या भिंती
नाही टेबलावर ओनिडाचा टीव्ही
अंगावर सर्फचे शुभ्र कपडे नाहीत
मोरीत लक्सचा सौंदर्य सुगंध नाही
तरी तुझी वाट पहात
शरीराच्या वीटेवर
आभाळातून लाखो शॅम्पू तुझे केस घेऊन कोसळत आहेत
क्रीमचे लाखो सुगंध तुझे श्वास घेऊन अलगद वाहता आहेत
लीपस्टीकच्या लाखो कांड्या तुझे ओठ घेऊन खांद्यावर बसता आहेत
पावडरीच्या लाखो डब्या तुझे गाल घेऊन गालास डसता आहेत
मी कुणालाच नाही म्हणत नाहीये
मी सर्वांना अभय देतोय
रक्तात जाहिराती घुसतात तेव्हा
तुझ्या माझ्या एकांताचे पर्यावरण गातो

॥३॥

मी काय करू शकतो काय करू शकतो मी
चेहरा का कधी दुरुस्त होतो दुरुस्त होते कुरुपता
अंगावरच्या डागांना नसतो परमेश्वराचा चेहरा
किडक्या दातात वावरत नाही जाहिरातीचे एकही मॉडेल
नाही तुझा दोष
नाही तुझा अवगुण
सारेच आता सगुण
प्रत्यक्ष मागते
आताशा देवसुद्धा सर्वांना कृष्णासारखा प्लेबॉय रूपात आवडतो
फुलपाखरेही अभंगातली आता फक्त कवितेत उडतात

मी मात्र हे विसरलो तुला
गोलाकार स्तनांचा कैफ आहे
विसरलो की तुला तुझ्या
योनीवरती नाज आहे
मी आपला धावत सुटलो
ऑन युवर मार्क
सेट
ॲण्ड गो
धावत सुटलो नसानसातून पेशीपेशीतून
ओवीत सुटलो इंद्रियांना इंद्रिये संहिताना संहिता
मांड्यात शिरलो स्तनात उसळलो पाठीत हुंदडलो
श्वासात वितळलो अंगभर उधळलो योनीत पहुडलो
आले जेव्हा भान तेव्हा तुझ्याच योनीच्या मुठीत होतो
श्वास घ्यायला जागा नव्हती दोन ओठांच्या चिमटीत होतो
बर्फच बर्फ अफाट बर्फ काळा बर्फ घनदाट बर्फ
नाही हवा नाही सूर्य नाही आग फक्त वीर्य
हळूहळू साठत गेलो साठत गेलो गोठत गेलो
एका रात्री बर्फाळ मुठीत मीच काळा बर्फ झालो

॥४॥

आता ह्या स्टेशनवर कधीचाच उभा मी
तुझ्या अपेक्षेत
योनीतून फेकून दिलेल्या स्पर्मसारखा काळ्या बर्फाची वीट होऊन
तुझ्या प्रतिक्षेत
कविता पानासाठी मला उचलून न्हेतायेत तुझे शब्द
काळा बर्फ कवितेमध्ये गळ्यात त्यांच्या थ्रिलींग अब्द
करत नाही मी प्रतिकार तेही वेटरसारखे येत राहतात
माझे पाणी होणार नाही ह्याची पुरती काळजी घेतात
ठेवतात वैकुंठी फ्रीजमध्ये देतात आकार आखीवरेखीव
जेव्हा भाषेस कविता लागते ओततात मला करीत ओतीव
नाही देत मीही लक्ष्य पोएट इज डेड तेही समजतात
मला कुठेही न दुखावता अलगद उचलून कवितेत ठेवतात
मी काहीच करत नाही विठ्ठलासारखा उभा राहतो
क्रमशः वीट वितळत जाते कवितेमध्ये नाहीसा होतो

## थिएटर

॥१॥

थिएटरच्या प्रत्येक खुर्चीत बसले आहे तुझ्या माझ्या प्रेमाचे प्रेत
पडद्यावरच्या प्रत्येक शॉटमधून वाहतय तुझ्या क्लोजअपसचे शेत
दाराबाहेरच्या प्रत्येक तिकीटफाड्याच्या हातावर तुझ्या हस्तरेखांची रेत
खूनाने बरबटलेल्या काळोखात
कधीपासून शोधतो आहे मी खुर्ची सोसत त्रागा
प्रेतांच्या अमानुष गर्दीत
मला जिवंत बसता येईल अशी जागा
पण सरकूच शकत नाहीये माझे जिवंत पाऊल
माझ्या साध्या हाताची जरी लागली चाहूल
तरी अंगावर चालून येतात आडव्या तिडव्या आत्महत्यांच्या रांगा
आणि वर फिरणारे पंखे उचलू बघतात माझ्या टांगा
शोधत बसतात माझ्या डोक्यावरील
मृत्यूने तयार केलेले टक्कल
संपूर्ण थिएटरभर तुझ्यातच खिळून राहिलेली माझी अक्कल

॥२॥

मोहोत्सव आणि महोत्सव
कुणाच्याच धुमधडाक्यात गजबजत नाही माझा जीव
ओलांडत नाही माझा प्राण कुठल्याच तृष्णेची शिव
पण तरीही यावे लागते मला महोत्सवासाठी थिएटरात
तुझ्या प्रेमात स्वतःला जिवंत ठेवण्यासाठी
आपल्या प्रेमकथेतील स्पंदने ऐकण्यासाठी
त्यामुळे मृत्यूच्या साऱ्या कटकट्यारी थिएटरात फिरत असतात तरी
मी येतो आंधळेपणाने महोत्सवाला विनाअट
माझा चेहराही न पाहता मला दिले जाते तिकीट
आणि मी माझ्या चेहऱ्यावर तुझे मिरवत प्रेम
प्रत्येक फ्रेम डोळ्यात करत जातो फीट

॥३॥

माझ्या घरात नसते कधीच भाकरी
त्यामुळे बुकिंग क्लार्कने साहेब जेवणाचं काय असं सहज विचारलं तरी
मी बघून घेईन म्हणतो बेफिकीरी
मी आख्खा दिवस फक्त तुला पाहण्यासाठी थिएटर बुक केलेले पाहून

क्लार्क बनतो चिंताग्रस्त त्याला वाटतो मी अघोरी
पण त्याच्या चिंतेपेक्षा जिवंत वाटते मला
पडद्यावरील तुझ्या चेहऱ्याची अफवा
म्हणूनच जेवण वगैरे न घेताच टाकतो मी
थिएटरमध्ये पाऊल पेटवत कपाळात काजवा
खाण्याकडे दुर्लक्ष्य करत
स्वतःसाठी जिवंत बसण्यासाठी खुर्ची शोधत
थिएटरमधल्या तुझ्या माझ्या प्राचीन भेटी आठवत

॥४॥

तिकीटफाड्याला नसते माझ्या प्रेमाचे कौतुक
त्याच्या हाताला सहेतूक सवय असते ती फक्त तिकीटाच्या कागदाची
म्हणूनच माझ्या तिकीटावर पडलेले रक्त पाहण्याचीही
तो घेत नाही तसदी
त्याच्या दृष्टीने ही असते तुला पाहण्यासाठी मी दिलेली किम्मत
जिवंत राहण्यासाठी दाखवलेली हिम्मत
म्हणूनच तिकीट फाडले की तो मला ढकलतो आत
मृत्यूच्या भीषण काळोखात
आणि मी वेड्यासारखा माझी जिवंत बसण्याची जागा शोधत
थिएटरभर हिंडत असतो
प्रत्येक खुर्चीत बसलेले असते आपल्या प्रेमाचे प्रेत
प्रत्येक शॉटमधून वहात असतं तुझ्या क्लोजअप्सचं शेत
आणि प्रेमाला मध्यंतर नसल्याने
तिकीटफाड्याने बन्द केलेलं असतं दार
THE END पर्यंत

## श्रीधरा

॥१॥

तळहातावर जाळत प्रतिक्षेचा कापूर
तू तिची का करत आहेस आरती श्रीधर ?
तिच्या डोळ्यातील हिरवेगार गवत
का तुझ्या काळजात आहे उगवत ?
वास्तवाच्या लाकडी बांधकामाला लाकूड म्हणणारा
तूच का तो श्रीधर
अरे कुणाच्या स्वप्नात तुझी अशी अफवा झाली ?

रडू नकोस
तुझ्या डोळ्यांच्या कपाटात कितीही अश्रूंची कबूतरे गुटरगुली
तरी येणार नाही तिच्या शब्दांना मेसेज पाठवण्याइतकीही दया
उजळणार नाही तिच्या ओठांच्या काळोखात
तुझ्या रोमॅण्टीक प्रेमाचे भावविभोर गाणे
वळणार नाही तुझ्या कवितेकडे तिची काया
श्रीधरा
वाट पाहू नकोस
नाहीतर प्रतिक्षेतच जाईल आयुष्य वाया

॥२॥

तुझ्या घराच्या चौरस वाळवंटात
कोण ठेवून जातं हा प्रेमाचा उंट अनवाणी ?
त्याचे पोट फाडूनही
का मिळत नाही तुला पिण्यासाठी पाणी ?
चाव्यांच्या किचनमध्येच फक्त वावरावीत का
शेअर केलेल्या डिवाईन फळांची डिझाईन्स ?
प्रेमाच्या तडकलेल्या ग्लासातच का जमा व्हाव्यात
मादक आठवणींच्या नशील्या वाईन्स ?
अस्तित्वाच्या खुर्चीतून का उगवत नाही
करुणेच्या झाडाची शाखा
ह्या एकटेपणाच्या वाळूला कुठंपर्यंत दूर लोटणार आहेस श्रीधर ?
कुठंपर्यंत वाढवणार आहेस
तुझ्या लवस्टोरीचा गॉसिपींग करणारा नाका ?

॥३॥

समुद्र हटवून हा पॉईंट वसवला
ह्या पॉईंटलेस महानगरीत असं म्हणतात
महानगरीची लोकसंख्या अवाढव्य
गिळून टाकते माणसातील जे जे भव्य
तिच्या प्रत्येक नरड्यात रोमॅण्टीक गाण्याचा मर्डर
आणि आकाशाकडे तोंड उभी करून असलेली प्रत्येक इमारत
म्हणजे इथल्या भांडवलशाहीच्या चौचाकींचा शोफर
अशा ह्या आसमंतात लोफर
उदास होईल तुझ्यातील लवर
नाहीतर काय होईल श्रीधर ?

श्रीधरा, समुद्रसुद्धा समुद्र वाटत नाही इथे
महानगरींची सार्वजनिक मुतारी वाटतो

॥४॥

ती ह्या महानगरीची सनातन वारसदार
आजऱ्यासारख्या आजारी तालुक्यात जन्म झाला तिचा
तरी शेती न करताच वाढली ती महानगरीत
अवगत करीत यांत्रिक खाचाखोचा
तिच्या देहाला भावली नाही मातीची लाल चोळी
आकाशाच्या परकरची निळी बू
चढवली नाही कायेवर कधी तिने घनसाळाची घनदार खुशबू
फक्त कॅक्टससारखी वाढत राहिली ती ह्या महानगरीत
फॅक्टसच्या फॅकल्टीकुंडीत
तिने फुप्फुसे उघडली तेव्हा हवा नव्हे प्रदूषण होते तिच्या मुंडीत
आणि रांगणे ती शिकली ट्रेनच्या अंगणात माणसांच्या मण्डीत
तिच्या जन्मगावाकडे निरखून नको पाहू
श्रीधरा फसले जिथे तुझे देहू
ते तिचे वाढगाव होते
जन्मगाव नव्हते

॥५॥

तुला करीबी स्त्रीयांचाच का मोह श्रीधर
तळहाताजवळचे स्तन
का घडवतात नेहमी तुझे प्राक्तन ?
तुझ्या मूळाभोवतीच का फुटतात तुझ्या आदिम वासनेला शाखा
तुझ्या बहिणीने सांगूनही
का त्वचेचा गणपती बुडवलास गल्लीतल्या गणेशोत्सवात
श्रीधरा
का हे असे केलास ?

॥६॥

पत्रातून का परत येते दुखावली गेलेली व्यक्ती
आपण आयुष्य पणाला लावून संबंधावे
आणि समोरची व्यक्ती त्या संबंधातच हार्टफेलने मेलेली असावी ?
जिच्या पैश्यावर पोसल्यास तू तुझ्या त्वचा
तिचीच मूक झालीये आता वाचा

श्रीधरा पत्र लिहू नको पत्राचा उपयोग नाही काही
शेवटी पत्र म्हणजे आत्मा नसलेली शाई

॥७॥

जीव लागणार नाही तुझ्या नाटकात
फाटकातच उभा राहील प्रेमात पडलेला संत
रंगमंचावरील अभिनयपुतळ्या का कधी होतात बाळंत
तुझ्या त्वचा पोहचवलास त्यांच्यापर्यंत
तर देह करतील त्या आकुंचित
संकुचित करतील प्रतिसादाचा कंप
अरे स्पर्श सेल्फ डिपॉझीट व्हॉल्टमध्ये डिपॉझीट करूनच
करत असतात त्या ॲक्टींगची क्रीडा
रोमॅण्टीक गाण्यांना देह भाड्याने दिला तरी
त्यांच्या देहात उतरत नाही अनुभवाचे रक्त सोसण्याची पीडा
त्या डोळ्यांना पाजतात फक्त त्वचा
आणि प्रेम खायाला न घालता पाजतात डॉयलॉग्जमधून प्रेमाची वाचा
श्रीधरा, वाचीक नाही तुझी गाथा
हाच खरा प्रॉब्लेम आहे

॥८॥

तिला नष्ट करण्याचा प्रयत्न करूनही
का नाही होत तिचे भास नाहीसे
पंचगंगेच्या काठावर हिंडताना
कसे काय ढगावर रांगायला लागतात काळजातले तिच्या आठवणींचे ससे ?
किरण फुटण्याआधीच का गोठतात तुझे सूर्य तिच्या हातात
तिच्याच ओंजळीने का पितात तुझे ओठ आयुष्याचा प्रकाश
श्रीधरा
तिच्याच बोटांना धरून का धावतात तुझे काळ तुझे अवकाश ?
सावकाश

॥९॥

एकाचवेळी दोन पुरुषांवर
कसे काय करू शकते प्रेम स्त्री श्रीधर ?
की ती कुणाच्याच प्रेमात नसते
तेव्हा दोघांच्या प्रेमात असते ?

गळ्यातल्या शपथा केवळ ड्राईव्ह करताना घेतल्या म्हणून
का होतात खोट्या ?
उत्साहाच्या उत्सवांना बॅकग्राऊन्ड मिळते
ते का बेवफाईचे थोट्या ?

॥१०॥

यंत्रे वाढत जातात
म्हणून का छाटावेत माणसांनी हात ?
वीजकेन्द्रे वाढली म्हणून
का माणसांनी बसून रहायचे इलेक्ट्रीक चेयरवर मृत्यू पहात ?
की महानगरीत जन्मलो की समजायचे
आपण यंत्रे बाळंत झाल्याने आलोय जगात ?

॥११॥

तू तरी कुठे सोडली होतीस वास्तववादी भूमिका श्रीधर
स्वप्ने भरण्याऐवजी तूच भरली होतीस ना तिच्या डोळ्यात
मॅनेजमेन्टची ॲपल्स
तळहातावर फुले ठेवण्याऐवजी
तूच केली होतीस निरोधची पॅकेटस स्टेपल
मग तरीही का अस्वस्थपणे गलबलून येतो तुझा जीव
की तिच्यामुळे तुझे नातेवाईक तुटले
म्हणून काळीज टोचत राहते मेंदूची शीव ?

॥१२॥

कुणीतरी योगायोगाने एकत्र येतात
आपण तयार रहातो
कुणीतरी अपघाताने संग करतात
आपण गर्भात जातो
कुणीतरी योगायोगाने बाळंत होतात
आपण जन्म घेतो
कुणीतरी योगायोगाने त्वचा पेटवतो
आपण देह शोधतो
कुणीतरी योगायोगाने देह आटवतो
आपण मरण पावतो

*

# ९. प्रिझम

## कवी

(दिलीप पु. चित्रे, नामदेव ढसाळ, विलास सारंग, भालचंद्र नेमाडे, चन्द्रकांत पाटील, वसंत डहाके, तुळशी परब, सतीश काळसेकर, अरुण कोलटकर ह्यांच्यासाठी)

कवींना नेहमीच कळते
आयुष्यात ते
नेमके कुठे उभे आहेत
कवी भाषेत जन्मतात
कवितेत नाहीसे होतात
कवी आयुष्याला पुरून भाषेत उरतात

## तुझ्या शरीरात मी पाऊल टाकणार नाही

तुझ्या शरीरात मी पाऊल टाकणार नाही
तुझ्या देहात हिंडतंय माझं वीर्य हे खरं
हेही खरं की माझ्या प्रत्येक उगवत्या हस्तमैथुनाला आहे वास
आपल्या मावळलेल्या संभोगांचा खास

तरीही तुझ्या शरीरात मी पाऊल टाकणार नाही

तुझ्या अवयवांची अंत नसलेली देवळं
तुझ्या श्वासांच्या अनोळखी बागा
तुझ्या पेशीत हिंडणारा वासनेचा वारा
माझ्या त्वचांच्या भिंती कोसळवणाऱ्या तुझ्या स्पर्शाच्या धारा

एका अनाकलनीयतेत उभी आहेत माझी वाया गेलेली वर्षे

जिथे मी कामाळलो
तिथे होते तुझेच फाटक
ज्यात मी प्रेमाळलो
तिथे होते तुझेच घर तुझेच त्राटक

आता स्मरणाच्या प्रत्येक पोलीस चौकीवर आहे
तुझा वॉन्टेड म्हणून फोटो फोटोतला तुझा नखरा
माझ्या प्रत्येक इन्स्पेक्टरला हवा आहे
तुझा दूधी चेहरा चेहऱ्यामागचा चरा

तरीही तुझ्या शरीरात मी पाऊल टाकणार नाही

परिणामाचं काय मला नाही माहीत
शक्य आहे की इथला शहरी कोयता छाटून टाकेल
माझं गावरान अस्तित्व
चालत राहतील माझ्या बोटावरून माणसांचे काढलेले डोळे निःसत्त्व
सोपवतील इथल्या ब्लेडसच्या कंपन्या
माझ्या अंगठ्यावर द्रोणाचार्यांची दाढी शोधण्याची कामगिरी
हुंगण्याची शिक्षा होईल माझ्या नाकाला
शहरातील सगळा कचरा त्या कचऱ्याची कारागिरी

तरीही तुझ्या शरीरात मी पाऊल टाकणार नाही

नाही आयुष्याच्या कागदावर दोन्ही बाजूला कविता लिहिण्याचा माझा अट्टाहास
अद्याप आहे कायम
संवेदनांच्या मलपृष्ठ आणि मुखपृष्ठातील कळत नाही
मला अद्याप फरक
माझा पेन शाई संपली की वळतो
अद्याप तुझ्या शरीराकडे हे खरे
पण मी कविता मोडेन
पण वाकणार नाही
ह्याला तू समज इस्लामी अहंकार
किंवा मराठी छाती
भूगोलाचा पलिकडेच असतात माझ्या साऱ्या कृती
तेव्हा मोक्षाच्या उंबरठ्यावर असताना
मला देऊ नकोस तुझ्या कायीक भूगोलाची लाच
मी बघणाऱ्यांपैकी नाही
मी बघणार नाही

मी तुझ्या शरीरात पाऊल टाकणार नाही

## बस

॥१॥

तिचं लग्न झालं
नाजूक सायकलीवर चालून यावेत ट्रक
तश्या येतायत अंगावर
बातम्या-बातम्या तुझ्या लग्नाच्या
माझ्या देहाला बांधून एका जखमेची गाठ
करतायत माझं पोतेरं
बातम्या-बातम्या तुझ्या लग्नाच्या
कोठल्या अफवेत लोळवू आता मी
पायातून उसळी मारणाऱ्या ह्या अनपेक्षित दुःखांना ?
कुठल्या अश्रूंची आंघोळ घालू
माझ्या दगड झालेल्या डोळ्यांना ?
कुठल्या सौभाग्यवतीचे कुंकू लावू
माझ्या चमत्कारिक प्राक्तनांना ?
कसा रूपांतरू माझ्या भोवतालचा वर्तमानपत्री आसमंत
एखाद्या रोमॅण्टीक कवितेत ?
जगण्याच्या प्रत्येक सीटवर
निराशा डोळे उघडे ठेवून बसलेली दीनवाणी
विस्तव वाटत फिरणारा कंडक्टर
मागतो आहे माझ्याकडे
अश्रूंची सुट्टी नाणी
आणि माझ्याकडे असलेली
काळजाची शंभर रुपयाची नोट केविलवाणी
कुठे सुट्टी करायची म्हणून
विवंचनेत पडलेला आहे मेंदू
वास्तव वाहून नेणारा ड्रायव्हर
थांववतोय परेशान होऊन
प्रत्येक स्मशानापुढे बस
आणि मी चमत्कारिकपणे वाट पहातोय
कुणीतरी चढेल म्हणून

॥२॥

माझी वस
तुझी वस
असण्या नसण्यात
ह्या शहरातील सगळ्याच बसेसना लाल रंग का असतो
हा तुझा चमत्कारिक प्रश्न
ह्या शहरातील बसेसवर
सर्वच स्टेशनांची नावे
काळ्यावर पांढरी करून लिहावी लागतात म्हणून
हे माझे तितकेच तऱ्हेवाईक उत्तर तीक्ष्ण
आपल्या बसस्टॉप मुलाखतीची कुठे झाली सुरवात
तेही नाही मला आठवत
तो स्टॉप तुझा होता की माझा
हेही नाही मला स्मरत
आपण दोघेही कुठेतरी चाललो होतो त्यावेळी
एवढं निश्चित
नाहीतरी ह्या जगात चालण्याशिवाय काय आहे शाश्वत

।३॥

बसस्टॉपवरचे तुझे चमत्कारिक प्रेम
आवडले नाही मला कधीच
मेकअप करून गिऱ्हाईकाची वाट बघावी
तशी असायचीस तू उभीच
चमत्कारिक पोझमध्ये ओज घेऊन
तुझी बाही कधी अर्धी कापलेली
तर तुझी जीन कधी अर्धी छाटलेली
मांड्यावरचे ढग उधळीत तू मागायचीस
जेव्हा जमिनीकडे पीक
तेव्हा चमत्कारिकपणे मी पहात बसायचो
रस्त्यावरची डांबरी खडी तिचा काळा पीच
वुलडोझर आणण्याच्या साध्या कल्पनेनही दचकायचीस तू
आणि मी शपथ घ्यायचो
उखडत चाललेल्या रस्त्यावर एक भगवी पिंक टाकून
शहर स्वच्छ करायची

।।४।।

तुझ्या माझ्या भेटी
मध्ययुगीन राणीच्या राजसंभोगासारख्या दुर्मिळ
हे अष्टावक्र शहर सोळाव्या शतकात आहे
की आपण दोघं
हेच कळायचं नाही मला
विशेषतः तू जेव्हा आईची साडी नेसून
कुंकवावर चमत्कारिक बोलत बसायचीस तेव्हा
ब्रेकडान्सच्या खडतर पोझसुद्धा रबरासारख्या हाताळताना
कथ्थकाआधी नारळ फोडावा
तशी देह फोडायचीस तू
चमत्कारिक सतीच्या तऱ्हेवाईक पोझमध्ये
आणि मी कुठल्यातरी चमत्कारिक शतकात
आईन्स्टाईनची आगगाडी पळवावी तशी
बस पळवायचो
तुझ्या स्टॉपपासून लांब दूर
उदबत्त्यांचा वास जिथपर्यंत पोहचणार नाही
एवढ्या अंतरावर पेलत तुझा नूर

।।५।।

मी तुझ्या वहिणीच्याही प्रेमात पडलोय
हे मी तुला सांगितलं तेव्हा
केवढी दचकलीच तू
बस खड्ड्यात गेलीये हेही लक्ष्यात आलं नाही तुझ्या
चमत्कारिकपणे पुटपुटलीस
ही फुलॉप बस हे फूलटॉस शहर
आणि हा नॉनस्टॉप बसस्टॉप
आणि हा विशेषणातीत खड्डा
आणि एक दिवस चमत्कारिकपणे म्हणालीस
मीही प्रेमात पडलीये
काही करत नाहीये मुलगा
मीच त्याला पोसेन म्हणते
आणि मग चमत्कारिकपणे हसून
निघून गेलीस

॥६॥

आणि आज तुझी बातमी आलीये
तुझं लग्न झालं
मी बसस्टॉपवर कुणाच्याही प्रतिक्षेत नसताना
आणि बस आता चाललीये
कुठल्याही खड्ड्याची पर्वा न करता
कुठेही स्मशान दिसले की
ती आता थांबते
कुठेही धाप लागली की
ती आता घण्टा वाजवते
आणि मी चमत्कारिकपणे वाट पहातो
कुणीतरी चढेल म्हणून
कुणीसुद्धा चढत नाही

## इन्टरनॅशनल

॥१॥

दूरवरच्या गावंढळ गावातून
आलोय मी तुमच्या संगमरवरी अंगणात
तुमच्या हातात नसतील माझ्या स्वागतासाठी फुले
याचा आधीच होता मला अंदाज
म्हणूनच तुमच्याकडे पाहताना
हात पाहिले नाहीत तुमचे मी घरंदाज
तुमच्या डोळ्यात किती आहेत बुलडॉग्ज
तेच न्याहाळत होतो मी तटस्थपणे घेत पॉज

॥२॥

तुम्ही कळपाने इथे जमलेले व्यक्तीवादी जोपासता आहात
स्वतःचे व्यक्तिमत्त्व
मला कबूल
तुमच्या इंद्रियाचा विकास व्हावा म्हणून घडवता आहात
तुम्ही कलात्मक उत्क्रांतिचे सत्त्व
मला कबूल
तरीही तुमच्या सॉफिस्टिकेटेड सोफासेटवर
झोपू शकत नाही माझा मेंदू
तुमच्या तळहातावरच्या खुर्चीत

निवांत बसू शकत नाही माझ्यातला एकही बिंदू
मी होतो सरळ तुमचे पायपुसणे
ओले आणि देखणे
आणि वाचत बसतो
माझ्या मराठी मायबोलीतल्या कविता उपाशी
ज्या संकोचाने उभ्या असताता
तुमच्या इंग्रजी झाडूपाशी
जैशी तुपात पडलेली माशी

॥३॥

इंग्लंडमध्ये जन्मण्याऐवजी
चुकून इंडियात जन्मलेले तुम्ही अमेरिकन लोक
तुमच्या फ्रेंच नाकाला
फार झोंबते माझ्या कोल्हापूरी वासाच्या वहाणांचे टोक
तुमचे जर्मन ओठ
घेऊ शकत नाहीत माझ्या कड्याचे चुंबन
तुमचे इटालियन पाय
वावरतात माझ्या चाळांना देताना आलिंगन
त्यामुळेच तुम्ही समोर आला की
उदास होतो माझा जीव
माझ्या उदासीचे कारणही
सांगू शकत नाही मी तुम्हाला
कारण तुमचे प्रश्न असतात इंग्लिश
माझी उत्तरे मराठी
कुणाचे कुणालाच काही समजत नाही

॥४॥

माझे प्रश्नही असतात विचित्र
न्यूनगंडाने पछाडलेले
तुमचे फ्रॉक उतरवून
तुम्हाला लुगडी नेसवली तर काय होईल
तुमचे बूट काढून घेऊन
तुम्हाला कोल्हापूरी पायताण घालायला लावले
तर तुम्ही कसे चालाल
तुमच्या बॉबकटचा बुचडा मी बांधला तर

तुमच्या कुंतलात शाकुंतली रात्र होईल का ?
वगैरे
खरेतर ह्या प्रश्नांना अर्थ असतोच असे नाही
तरीही मी ढोलकी वाजवताना
तुम्ही जेव्हा उगवता पियानो घेऊन क्यूट
तेव्हा माझ्या पाव्याला तडे गेलेले असतात
तुमच्या फ्ल्यूटचे

॥५॥

संवाद साधावा
अशी इच्छा असते मलाही
वाटते तुमच्या ओठांना द्यावेत ओठ
आणि स्तनांना माझी छाती
पण का कुणास ठाऊक
तुमचा बेड समोर आला की फाटते
माझी वाकळ
आणि तुमच्या डोक्यावरच्या हॉटेलात सोसत कळ
नेसकॅफे पिण्याखेरीज मुकाट
काहीच उरत नाही माझ्या हातात

॥६॥

मोझार्ट बाख शूबर्ट क्वील्टर ड्रीगो
इब्सेन शॉ बेकेट आयनेस्को
किती गडगंज नावे उच्चारता तुम्ही
ऐकतानाही ती हादरतो माझ्या पोटातला ऊस
सटपटते माझ्या मांडीतील केळाचे पान भयाची मूस
जीवाचा करार करून ऐकतो मी तुमच्या पियानोचे लाघव
डोळ्यांचा कंदील करून पहातो तुमचे दृश्यसौष्ठव
मैल मैल पसरतो तुमच्या थिएटरमध्ये
पण तरीही भावत नाही मला तुमचे भावन
माझ्या छातीवरचा साधा केसही उजळत नाही
तुमच्या प्रकाशयोजनेने
आणि मग मी
निमूटपणे जाऊन वसतो तमाशाला शोधत बाधा
रंगमंचावर माझीच वाट पहात असते राधा

फक्त तिच्या हातात घागर नसते आताशा
पिशवी असते जी वहात असते तमाशा
आणि तिच्या गवळणमैत्रिणी मात्र
गोकुळमिल्क विकत शहरभर हिंडत असतात
वाजवत परंपरेचा ताशा

॥७॥

मी तुम्ही होणार
की तुम्ही मी होणार
हा प्रश्नही विचारत नाही मी आताशा
माझ्या मराठमोळ्या छातीला आवडत असतात
तुमची गोरी लालसर स्तनाग्रे त्यांचा बताशा
एवढे मात्र खरे की हळूवारपणे
रूळत असतो तुमचा बॉबकट
मिसळीच्या कटासारखा माझ्या गुप्त केसावर
त्यामुळेच आताशा
दाढी कुरवाळतानाही मूडमध्ये असतो मी जसा मिळावा एखादा अनपेक्षित वर
तुमचे केस कोणते
माझे केस कोणते
मला कळत नाही
फक्त दाढी करताना उचलतो मी माझा ब्रश
आणि गात बसतो एक आंतरराष्ट्रीय गाणे क्रियेटींग क्रश
I have a swiss blade which is international
I am a swiss blade which is made in India

## मुंगळ्या, आंधळे आणि हत्ती

॥१॥

उदासीचे एक अजब वारूळ
बांधत जातात मुंग्या हत्तीच्या देहात
त्या देहावर केव्हा चढतात
कळत नाही हत्तीला
वारूळावरून त्यांचे सापळे उतरतात तेव्हा
आत काहीतरी पोकळतय
एवढंच जाणवत असतं हत्तीस
त्यांच्या हातात असतात साखरेच्या बॅगा

आणि पायात
आराम हराम है च्या पाट्या
कोणत्या आदिबंधातून झपाटतो त्यांना
जगण्याचा निरर्थक खटाटोप
कोणास ठाऊक
पण त्या राणी मुंगी न निवडताच
ह्या शहरात पसरत जातात एवढं खरं

॥२॥

त्यांच्या संख्यांना नसतो कधीच नियम
त्यांच्या बाळंतपणासाठी
नेहमीच असते हे शहर सुसज्ज
कोठून कोठून येतात त्या साखरेसाठी
ह्या शहरात होऊन निर्लज्ज
कोणताही प्रदेश नसतो त्यांना वर्ज्य
जिभेत साखरेची चव घोळली
की लांब होतात त्यांच्या टांगा
आणि आपसुख पसरतात त्या
ह्या शहरात लावत रांगा
लाल काळ्या पांढऱ्या जंगली सुशिक्षित
किती किती प्रकार असतात मुंग्यांचे
पण मुंग्या मुंग्याच असतात अखेरीस
त्यांचे चावे कडक असले तरी
लाळाच घोटत राहतात त्यांची तोंडे
बॅलन्स करत वॉर ॲन्ड पीस
हत्तीला अधिक पाय फुटावेत
अणि आपल्याला
वारूळे बांधण्यासाठी उपलब्ध व्हाव्यात जागा म्हणून
आकांततात मुंग्या अधूनमधून
क्वचित चावाही घेतात आंधळ्या आवेशात
दुसऱ्या मुंगीचा सेफ्टी निवेशात

॥३॥

ऊसाविषयी कसलीच माहिती नसते मुंग्याना
ऊस जमिनीतून उगवतो
की आकाशातून

याचीही कल्पना नसते त्यांना
त्यांना आवडतात विकत मिळणाऱ्या गुळाच्या ढेपा
जाहिरातींनी लावलेल्या गोडव्याच्या टेपा
आंधळ्यानी चालवलेली
साखरेची दुकानं पाहून होतात खूष
पितात रोज आत्मसंतुष्टीचे पियुष
आंधळे साखर देत जातात
मुंग्या वारूळं बांधत जातात

॥४॥

हत्तीची दंतकथा
मुंग्या असतात जाणत
शहरात फार प्राचीन काळापासून
हिंडत आहेत सात आंधळे एक शोध ताणत
हा दृष्टांत जून
शहरात प्रवेश करण्यापूर्वीच
असतात मुंग्या ऐकून
कानाला हात लावताच
हत्ती होतो सूपासारखा
पायाला होत लावताच
हत्ती होतो खांबासारखा
मात्र संपूर्ण हत्ती
लागतच नाही हाती
आंधळ्यांच्या
तरीही आगतिकपणे हाताळत राहतात आंधळे
हत्तीला
त्यांच्या पायाखाली
पुन्हा पुन्हा सापडतात मुंग्या हे पाहूनही
ढोसत बसतात ते हातांनी
हत्तीला
मुंग्या मात्र हत्तीच्या पायाच्यावर कधीच चढत नाहीत
आपण कानापर्यंत पोहचलो तर काय होईल
याची असते त्यांना जाणीव
मुंग्या असतात शहाण्या
हत्तीइतकीच जागृत असते त्याची शहाणीव
म्हणूनच हत्ती आणि मुंग्या

गुण्यागोविंदाने राहतात ह्या शहरात एकत्र
अधूनमधून आयोजित करत एखादे सर्पसत्र
वारूळाविषयी हत्तीची
कसलीच नसते तक्रार
आंधळ्यांना फक्त चाचपत आकार
संपूर्ण हत्ती ताब्यात घेऊन
त्याचे कसे करता येईल दुकान
ह्या चिंतेने ग्रासलेले असते आरपार

## ही माणसं

ही माणसं
ज्यांच्या कपाळात दुःखाची तुळस
करुणेचं निरंजन
अंगणभर आयुष्य ज्यांचे
मातीएवढी मती
जी आकाशातील ढग पाहून जगतात
पृथ्वीत मुळे रोवून
जी स्वतःच्या फांद्या विश्वभर नेण्याचा प्रयत्न करतात
आणि एक दिवस
मुळांनाही पत्ता लागू न देतात परागंदा होतात
त्यांच्या ह्या निर्वासितपणाला पकडता येणं
तुला शब्द शक्य नाही
हे सारंच शब्दात साठवणं तुला शक्य नाही

आदी माहीत नसलेली ही माणसं
अंताकडे एका निष्ठेने प्रवास करतात
त्यांचा जगण्यावर विश्वास असतो
मरणावर संशय
स्वतःच्या अस्तित्वाकडे पाहून ती जेव्हा रडतात
तेव्हा त्यांच्या अश्रूंना
परमेश्वराची चव असते
त्यांचे हसणे आत्मकारुण्याच्या पलिकडचे
म्हणूनच ती स्वतःवर विनोद करू शकतात
आणि गर्भाशयाविषयी पुन्हा पुन्हा नवे सिद्धांत मांडून
विज्ञानाशी नाळ जोडून घेतात

हे सारंच शब्दात साठवणं तुला शक्य नाही

त्यांच्या तऱ्हा
ऋतूतील कोणत्याही वैफल्यावर मात करणाऱ्या
त्याचं अस्तित्व पिकत नाही
तरी त्यांना फळं येतात
ती फुलतात जगतात वाढतात
आणि एक दिवस
एखाद्या क्षणात आपल्या देहाची समाधी बांधून
कुणाला काही कळू न देता
नाहीशी होतात
त्यांचा पत्ता शोधणं तुला शक्य नाही
हे सारंच शब्दात साठवणं तुला शक्य नाही

## पर्याय

॥१॥

उमलत चाललीये
उमलत चाललीये देहाच्या जास्वंदीची नव्हाळी
माझ्या त्वचेतून उगवत आहे
वासनांचे संवेदनशील केसर
भरून घेतय भांड माझं
तुम्हा वायकांच्या ॲसीडचं उत्कट तीव्र द्रावण
मांडी माझी
सांडते आहे अष्टौप्रहर
एक नग्नतेचं शहर
मधोमधल्या शिवलिंगातून
उगवते आहे डमरूंचे तालनवलन ताण्डवचालन
आणि आख्खा देह करतो आहे प्रतिक्षा
नंदीबैल होऊन
कुणातरी भाविणीची

॥२॥

जगण्याच्या वळणावर
एक पर्याय नसलेल्या अवस्थेत
अवयव माझे
अभिनय माझे
शोधत आहेत एक खाजगी रंगमंच

असेल जिथे संच
टंच टंच कंचुकींचा
सौष्ठव माझे औष्ठव सांडीत
भिरभिरते आहे आसमंतात
दोन पहाडस्तनांचा घेत शोध
आणि
विश्वाच्या पवित्र स्तंभातून
पापक्षालन करून घेतो आहे
युद्धखोर बुद्ध
ज्याला आच शुद्धतेची

॥३॥

मोक्षाच्या आसक्तीचे एक अजब ताण्डव
माझ्या देहशैलीत
संभोग नाकारणारे
नृत्य माझे
लाच मागतय तळ्याएवढ्या पाण्याची
वस्त्रे उतरवून जिथे पोहता येईल अशा गाण्याची
आणि मी संन्यासाच्या कैफात
शोधतोय भगवा रंग सहज पचवू शकेल
अशी त्वचा
आणि कमंडलू पेलतील असे हात

॥४॥

कलेचं एक आग्यामोहळ
माझ्या अस्तित्वात
मधमाश्या माझ्या पेशी
वेचतात मध
प्रवास करतात मुंग्या माझ्या
एका विचित्र कात्रीवरून
मुंग्या आणि मध
साधत एक ढाळलेला तोल
गतिमानतायेत क्रिया अवघ्या उलगडत झोल
एक बांधलं जातंय मृगजळ अनमोल
तब्येतीत

॥५॥

संन्यास आणि कला
उत्क्रांतिच्या तिसऱ्या टप्प्यावर आहे मी
पर्याय दोन
आयुष्य एकच
मोक्षाच्या तळहातावर वाढलेली माझी आयुष्यरेषा
भांडते आहे
कलेच्या तळहातावर वाढलेल्या भाग्यरेषेबरोबर
आणि मी विमनस्कपणे करतो आहे प्रतिक्षा
माझ्या-हृदयरेषेची
जी तुम्हा बायकांकडेच गहाण असते म्हणतात

॥६॥

प्रत्येक निवडीमागे असतो एक अजब शहाणपणा
मला मात्र होतात वेदनाच
बायकांच्या शरीरामधून आरपार जाताना शोधीत खाणाखूणा
त्यांच्या सर्जक वाढीत असतो
एक चमत्कारिक कैफ
वाढण्याचा आणि वाढवण्याचाही
माझ्या नाकाला बायकांचा सुवाससुद्धा होत नाही सहन
संन्यासी नाक माझे
वाक काढतं आयुष्याचा
वाकत वसतो मी मित्रांच्या आणि मैत्रिणींच्या
दूरदर्शी संभोगात निष्कामपणे

॥७॥

वायकांना वगळून जगण्याची माझी रीत
आड आलीये माझ्या कलासंवेदनांच्या
पाण्यासारखे ओंजळीतून निसटून गेलेले
आयुष्य माझे
मोजते आहे आपले म्हातारपण
हाडे उरलेली सवाष्ण
ओटी भरतात तारुण्याची
आणि निरोपतात अनामिक दुःखांना
संभोगाचा कुठलाही पर्याय उपलब्ध नसतो

माझ्या सुरकुत्यांना
आणि वाढत चाललेले माझे वय
भर टाकते असंभाव्यतेत

॥८॥

कुठल्याही लग्नाला लागते इथे सौष्ठवरूप
पोट भरू शकतील इतके पैसे
घर उभा करू शकेल एवढी शिल्लक
आणि वस्त्रे नेसण्यापुरते शेअर्स
माझ्या प्रतिभेच्या कुठल्याही तळहातावर
वाढत नसतात ही पळसाची पाने
माझ्या कंगालीत कविता नांगरत बसलेले एक फुलपाखरू
सोशीकपणे बसून असते
आपल्या रंगात
मला घर नसते की दार
आवारा हिंडत असतो मी वारा खात
स्वतःच्या संन्यासही पेलता न आल्याने कष्टी होत

॥९॥

कुठल्याही एड्सची पर्वा न करता
मी आलोय तुझ्या व्यवसायिक दारात
मोक्षाच्या सर्व शक्यता गमावून
संभोग भाड्याने घेऊ शकेन इतकेच पैसे आहेत
माझ्या खिश्यात
आत जावे की न जावे
मांसाच्या खरेदीविक्रीला सक्त विरोध करणारा मी
मुठीएवढे मांस घेऊन
तुझ्या योनीत उतरण्यासाठी
तुझ्या दारात
शरमेनं मान खाली घालून उभी असलेली माझी प्रतिभा
पुन्हा पुन्हा चाचपते आहे अन्य पर्याय
संभोग मुक्त न झालेल्या ह्या देशात
पर्याय नसतात
अवयव असतात
वासनेच्या एका सुन्न पिसाटीत

मी गोठवले आहेत माझे काळ
आणि तुझ्या योनीत विसर्जीत होतो आहे माझा संन्यास
मुस्काडीत मारून
बेदरकारपणे वाढतेआहे तुझ्या देहाची ढेप
आणि मी
अगतिकपणे सरकतो आहे मुंगळ्यासारखा
एड्सच्या कसल्याही संभाव्यता लक्ष्यात न घेता
अगतिकपणे

## डमी

हे जडावत चालले मन
भोवताली जीर्ण जग
मी शोधतो वळून मागे
दिसते का कोठे रग
जगण्याची

सगळेच जाहले शिळे
डोळ्यांच्या झाल्या शिळा
मी होतो झाडांसारखा
तरी चुकतच गेल्या वेळा
वसंतांच्या

विश्वाचे वास्तव घड्याळ
स्वप्न आणि सत्य काटे
आयुष्य मांडून पुसतो
कुणाकुणात झाले वाटे
असण्याचे

गणतीला नसतो अर्थ
गणिताचा अर्थ शून्य
उमगते सारे तरीही
जाणवत राहते दैन्य
जाणीवेचे

एक थकवा गळी उतरतो
देह होतो अवघा जखमी
ज्याचे रक्त वाहतो तोही
मी नसतो असतो डमी
माझाच

## लाकूडतोड्याची कविता

(मित्रवर्य जयसिंग पाटीलसाठी)

।१।।

अरण्य संपते गावात
शोधीत येतो झाडे
कुऱ्हाड बुडते शहरात
सोन्याची शोधीत झाडे

वाढीचा खुंटतो अवयव
बहराचे फुटते झुंबर
शहराशी करतो संभोग
तरी त्याच्या माझ्यात अंतर

हे शहर यंत्राळलेले
इमारती हालती देखण्या
हात होती थकून शांत
हाताळीत कुऱ्हाडी चकण्या

मी लाकूडतोड्या खेडूत
शहराचा देह निरंतर
मी माळतो शहर तरीही
उरते आमच्यात अंतर

।।२।।

कुऱ्हाड हरवून माझी शहरात
मी आलो आहे देवळाच्या दारात
माझी कुऱ्हाड परत करील असा देव शोधत
माझ्या लिंगावर नाही कुठल्याच मोक्षाच सावट
वा निर्वाणाच कपट
माझ्या श्वासात नाहीत कुठल्याच शून्याची स्पंदने
वा आलिंगने
मी फक्त आलो आहे
शहरातली सोन्याची झाडे तोडण्यासाठी
कुऱ्हाडीची आच घेऊन

॥३॥

ह्या शहराची मला माहीत नाही जन्मतारीख
वा जन्मवेळ
हा शहराचा मी पाहिला नाही कधी तळहात
म्हणून विश्वाची पंचांगे असूनही हातात
अगतिक बनून बसून राहिलोय मी
देवाच्या दारात
येणारा प्रत्येक दिवस माझ्या थाळीत
वाढून जातो अनिश्चिततेचे तण
आणि देव मात्र देत राहतो
माझी कुऱ्हाड ह्या शहरातच परत करण्याचे आश्वासन

॥४॥

शहराच्या बऱ्याच अॅलोपेथीक बागा
वाळंत होतात माझ्या आयुर्वेदीक देहात
कम्प्युटरला सुरू झाला वेणा की
प्रसूत होतात नवीन नवीन बागा
आणि बागांच्या प्रचंड उत्पादनात
शोधत बसतो मी
मला शहरात जगवतील अशी
सोन्याची झाडे
प्लॅस्टीकचे वाडे

॥५॥

एखादी कविता सुरू व्हावी
आणि तिचा शेवट पूर्ण व्हायच्या आत
कवीच मरून जावा
तसे घडले आहे माझ्या
शहरावरावरच्या प्रत्येक संभोगावावत
शहराने ढीगभर पेटवले तरी
मी दाटत नाही ढगभर
आणि विहिरीत भरून घेतलेला तुडुंब घडा
पटकन एखादा धोंडा बसून फुटावा
तसे शहर फुटते माझ्या वेडवर
अंगाखालची गादीही गदगदून येते बघून

माझी नपुंसक ओल
आणि मी जात राहतो पंचगंगेवर
घेऊन चादर
पुन्हा पुन्हा
पुन्हा पुन्हा

॥६॥

शहरात विखुरतो वाढ
सोन्याची गवती झाडे
कुऱ्हाड शोधता शहरात
माळेल जी माझी हाडे

तो असतो देव शहरी
त्याचे अर्धे शरीर बाई
मी गर्भात जाऊन येतो
तरी गवसत नाही आई

एक नागवी गुंतागुंत
अधेमधे लागती ब्रेक
मी रहदारीत सावधतो
प्रवासाचा जाता झोक

दिशाहीन अवघे जगणे
हे शहर म्हणजे तिरडी
मी तिला बांधतो काया
छातीवर दगडी दरडी

तो होतो देव प्रसन्न
मी बुडत जातो शहरात
सोनेरी कुऱ्हाड मिळते
तिला हसती खेडूत हात

## जू

॥१॥

गळ्यात मुकेपण मानेवर जू
चाबकाचं झोडपण वाढतच चाललंय

जखमांच्या कानात कापूस घालून बधीर होण्याचा प्रयत्न
शरीर रक्तबंबाळ होत नासतच चाललंय
मी तुला वगळतो
मी तुला पूर्णपणे सामावून घेतो
मी तुलाच एकाएकी नकोसा झालोय
हे कळून तुझ्यातून नाहीसा होतो
मी तीच तीच अक्षर
त्याच त्याच धुळीत
तशीतशीच गिरवतो
मी तेच तेच जू
त्याच त्याच मानेवर
तसेतसेच फिरवतो
मी त्याच त्याच जमिनीवर
तसा तसाच नांगर वहात
तसा तसाच तुझ्यातून चालत जातो
मी तीच तीच तुझ्या
असण्याची लावणी
तशी तशीच ऐकत नाहीसा होत जातो

॥२॥

शृंगार नेमकं करतो काय
कुणी करतो प्रेम म्हणजे करतो काय
छत्तीस कोटी प्रश्न
आणि त्यांना सामावून घेणारी एक गाय
मला दूध काढता येत नाही
मला गाईचा व्यावहारिक उपयोग ठाऊक नसतो
मला चहा पिता येत नाही
मी कॉफीचा ताजेपणा जाणत नसतो
मी असतो बैल
रानावनात हिंडणारा
जंगलात चरणारा
मातीत खूर खुपसणारा
तू मला माणसाळवतेस
माझ्या मानेवर जू ठेवतेस
मी जमीन नांगरण्याचा सराव करावा म्हणून
माझ्या शेजारी गाय आणून ठेवतेस

॥३॥

मला शेती दुरून स्पर्श करते
तू वीयाणातून देह प्रसवतेस
पाऊस माझ्यावर दुरून कोसळतो
तू ढगांचे कळप हाकत जातेस
प्रकाश मला अंतरावर ठेवतो
तू सूर्याचा नीट भांग पाडून त्याला रोज जमिनीच्या शाळेत पाठवतेस
तुला सारे सारे येते
मला काहीच करता येत नाही
तू सगळ्यासमोर जेव्हा
यंदा पीकपाणी नीट होणार का ?
म्हणून भविष्य विचारतेस
तेव्हा मात्र मला होय म्हणल्याशिवाय रहावत नाही

॥४॥

तू जमीन तू पाऊस तू प्रकाश तू नांगर
मी कोण माझे स्थान काय मी केवळ प्रश्न तू साक्षात उत्तर
मी तुझा चारा खातो पण तुझे पीक माझे मला वाटत नाही
मी ज़मीनीत शिंगे खुपसतो पण जमीन मला आपलीशी म्हणत नाही
गाय तुलाच वश असते वासरू तर तुझेच असते
मी तुझा कुणीच नसतो तुझ्यात माझे काहीच नसते
मी तसा काहीच नसतो असलो तर फक्त नसणे असतो
तू जेव्हा असणे नांगरत गातेस तेव्हा निमूट नसणे वहातो

## ये

॥१॥

शरीरापासून शरीरापर्यंत
मनापासून मनापर्यंत
आत्म्यापासून आत्म्यापर्यंत
गात असतो मी अद्वैत
तेव्हा तुझ्या गर्भाशयात माझे ओठ द्वैती होऊन उमलतात काय ?
माझ्या घरापासून तुझ्या घरापर्यंत
नृत्य करत असतो जेव्हा माझा रस्ता
तेव्हा तुझ्या भोवतालच्या भिंतीत माझे घुंगरु वाजतात काय ?
मी कधी शांत असतो मी कधी अस्वस्थ असतो

मी कधी प्रेमात डुबतो मी कधी चिंतेत पडतो
माझी जमीन जेव्हा पीक पालटते
तेव्हा तुझ्या देहात तू मला नांगरत असतेस काय
जेव्हा मला होत असते काहीतरी
उठत शिरशिरी
तेव्हा तुलाही काहीतरी होत असते काय ?

॥२॥

बुद्धाच्या सांत देहात उतरलेल्या अनंत निर्वाणासारखे
माझ्या आयुष्यात झालेले तुझे अपार्थिव आगमन
मी नव्हती तपश्चर्या केली
मी नव्हतो झाडाखाली बसलो
माहीत नव्हता मला मार
मी देव जाणीत नव्हतो
मी होतो मी होतो
मी फक्त होतोच होतो
ईडनच्या बागेतील ॲपलसारखा
ईव्हच्या प्रतिक्षेत
ॲडमच्या बरगडीचे व्हायोलीन वाजवत
ईव्हच्या अपेक्षेत
तू फक्त आत यावेस
यावेस आणि मला खावेस
मी जेव्हा तुझ्यात जन्मेन
तेव्हा मला समग्र गावेस

॥३॥

ये
सर्पाच्या जीभेसारखी ये अन् मला चाटत रहा
पेट
वाघीणीच्या भूकेसारखी पेट अन् मला खात रहा
घे
शुक्रजंतुसारखी शरीरात घे अन् मला फुलवत रहा
कर
भाषेसारखी जमा कर अन् मला कवितेत वाट
धोपट आपट थोपट लपेट
तुला जे करायचे ते कर

फक्त मला भोग
देहात नांदूनही जो देहापलीकडे असतो तोच खरा योग
ये
मला भोग
साध योग

॥४॥

तू कोण मी कोण
तुझे माझे संबंध काय
व्याख्या नकोत नकोत चर्चा
कुणाचे काय तर कुणाचे काय
एक चुंबन घे ओठात आणि ढग ओठात सोड
एक स्पर्श माळ त्वचेत आणि जमीनीत गारा पेर
एक श्वास ओढ पोटात आणि वाऱ्यात वीज वाजव
एक थेंब शोष देहात आणि सर्वत्र पाऊस रूजव

कोसळत रहा भिजवत रहा झिरपत रहा नांगरत रहा
आलीस तेव्हा पाणी होतीस पाण्यासारखीच माझ्यात वहा

## गर्भपात

॥१॥

आपल्या द्वैती दुःखाचा नाद ऐकत
मी आपल्या अद्वैती एकांतात
उदास आणि अस्ताव्यस्त
अवघं जग डिसकनेक्ट झालंय
आणि तुझा फोन येत नाहीये
मला माझ्या रक्तात शस्त्रक्रियेची शस्त्र नाचताना जाणवतायात
आणि तिकडे तू गर्भपात करावा लागणार म्हणून उदास
मी पहिली ओळ आठवतोय मग दुसरी मग तिसरी
जे गाणे आपण गायिले ते गाणे गेले कुठे ?
जो शेवट आपण हुंगला तो काट्यात वाळला कसा ?
प्लीज
एकदा तरी फोन कर जीव झालाय दुबळा ससा ?

॥२॥

अगतिकता
माझ्या आयुष्यात जाम झालेल्या ट्रॅफिकसारखी

शेकडो कर्णकर्कश हॉर्नसहित
अगतिकता
तुझ्या श्वासात गच्च झालेल्या प्रदूषणासारखी
करोडो सिगारेटींच्या निकोटीनसहित
दोन दुबळे जीव
दोन अस्सल प्रेमी
तुझ्या माझ्या घड्याळात दोन अजगर टिकटिकतात
तास तास घुसमटतात फोनच्या टारझनी गजराची वाट पहातात

॥३॥

इस्पितळ
इथे गर्भ कत्तल होतात आणि तेही पुण्य असते
डॉक्टरांच्या हातामध्ये कवितेचे नशीब नासते
एक आच एक चूक
तू मूक मी मूक
हेच ते इस्पितळ इथेच करीन गर्भपात
प्रकाश अवघा बधीर करत विझत जाते एक वात
तुझे पोट सृजन असते तुझे पोट नवा जीव
अगतिकतेची माझ्या ओलांडू मी कशी शीव ?
तुझ्या डोळ्यात नर्स नाचतात ॲनास्थाशिया अंगभर होतो
बाळाचा कोवळा देह ऑपरेशन टेबलवर कासावीस होतो

॥४॥

एकऽदोनऽतीनऽचारऽपाचऽसहाऽसातऽआठऽनऊऽदहाऽअकराऽबाराऽ
माझ्या तळहातावर तुझे दुःख घेऊन
मी न्याहाळतोय माझा चेहरा
शांतपणे - थकलेल्या डोळ्यांनी - शीणलेल्या पापण्यांनी
दुःखापुढे कोणताच मेकअप टिकत नसतो असं म्हणतात
मी चेहऱ्याला फासणार नाही आता भाषा
किंवा चिटकवणारही नाही कुठल्या अभिनयाचा नकाशा
फक्त तुझ्या गर्भाशयात शस्त्रक्रिया वाजली
की शांतपणे टेलिफोन उचलेन
आणि तुझ्या पोटातून झिरपणारे शव विषासारखे पिऊन
मीरेसारखा अनंत नाचेन

## मोगरा फुलला

सारेच संभोग येतात
उडून जातात
एखादाच सत्यात जातो दरवळून
वळून न पाहता जातो विरघळून

शरीराचे वास्तव वास्तवाचे शरीर
संहितांचे पीर बुडून जातात
फुटतात माठ अहंकाराचे विस्तवाच्या काठावर

लाटालाटातले पाणी उतरवून ठेवते बर्फाची त्वचा
ईश्वराला भेटायला निघाल्यासारख्या धावत सुटतात नद्या

श्वास श्वास रहात नाही
स्पर्श स्पर्श रहात नाही
पुरुष पुरुष रहात नाही
स्त्री स्त्री रहात नाही

सारे संस्कारण वितळून जाते
उमलत जाते कुठूनतरी फक्त निर्गुण निराकार
आणि सगुणाच्या झाडावर मोगरा फुलतो
मोगरा फुलला
मोगरा फुलला

देहाच्या अंगणात दरवळते सत्य
शांततेच्या गाभाऱ्यात नाहीसा होतो विस्तव

## पावसाळा

भर दुपारी
घेऊन सूर्याची सुपारी
ऊन पाजळतं उकाड्याची सूरी तेव्हा
नेटलॉनच्या आडोश्याला
डासाच्या अंतरावर ठेवत अवघा निसर्ग
उलगडत नव्यानेच आलेल्या गाद्यांतील उबेचा स्वर्ग
तू चाटतेस माझा कलता मनोरा
काढतेस म्यान तलवार खुली करत
आणि सांभाळत डोक्याचा तुरा
तुझी मान
पोहचते माझ्या हनुवटीपाशी

उपाशी
एक अधाशी सण्ण पेटते
एक भुकेला उपवास पेटतो
वाढते कोमेजले काळीज
मेंदू स्फोटतो
स्तनाच्या बोर्नव्हिटात
मिचमिचतात माझे ओठ
चहूबांजूंनी फुटतात वाटा
उघडझाप करतात डोळे
साऱ्या फ्लॉपीज धुडकावत
एक अनसर्टन टेक्स्ट उलगडत
अवयवांचा पिसारा नाचतो
मोराच्या शोधात
कलते मनोरे होतात ताठ
झुलते पूल घेतात गती
पर्यटनासाठी आलेला पाहुणा होतो मेहुणा
आणि सारे ट्रॅवलर्स चेक कॅश करून
मी परततो पुन्हा माझ्यात
भणंग भटकता
कलंदर फाटका
एक पाऊस कोसळून येतो
अवघा दुष्काळ कोळून पितो

## फुटबॉल

तिटकाऱ्यानं एका विलक्षण भरून जातं अवघं मन
स्तन स्तन आयुष्याचा उचकटून टाकतो फणकाऱ्याचा कण
वदलत राहतो द्वेषाचा फुटबॉल अमिबासारखा हरदम आकार
चालून येतात दिनॉसरसारखे खेळाडूंचे पायप्रकार
नियम तुझे अंपायर तुझा
कोच तूच स्पॉन्सरर तुझा
ज्यांना मिळते बाईचे प्रेम ते कुठल्या ग्रहावर खेळतात लोक
कुठल्या मैदानावर होतात पुरे निष्पाप खेळण्याचे ह्यांचे शौक
माझे तर तिन्ही लोक भोगतात नरक तुझ्या मैदानात
गडगडतात सारे यमनियम राजकारणी तुझ्या स्तनात
तुझ्या प्रत्येक खेळीविरूद्ध राखतो करुणेचं पेनल्टी क्षेत्र
झुंजतो तुझ्या तृष्णेच्या खेळाडूंशी उघडीत कष्टांचे करोडो नेत्र

बनत गुलाम नोकर भडवा कोमेजून जाते माझी झोप
सरकत राहतो ग्लानीत देह जगण्यात होतो जीवनलोप
जाणवत राहते एकच सत्य हे मैदान तुझे आहे
हे घर तुझे आहे हे रान तुझे आहे
कोणत्याही क्षणी दाखवशील तू माझ्या पुस्तकांना लाल कार्ड
कोणत्याही क्षणी माझी भूक रात्रीसाठी पाहील पिवळं कार्ड
कोणत्याही क्षणी गालावर मारशील
सत्तेची मुस्काडीत फ्री कीक म्हणून
संपवशील सामना व्यभिचाराच्या पेनाल्टीने
कायद्याने दिलेल्या राखीव खेळाडूकडून

सारे सारे तुझे आहे

तृष्णेचे खेळाडू
सत्तेचा अंपायर
घराचे मैदान
पैश्याचा स्पॉन्सरर

अविकसित देशाच्या संघासारखी सुन्न आहे अवघी गती
मैदानाबाहेर बसला आहे प्रेक्षक बनून सर्वव्यापी ईश्वर

## अनुभवामृत

कुणाला अर्पावी मी आता माझी कविता
माझ्याआधी ना गुरु ना कृष्ण ना गीता
अवकाशातील शून्यासारखी स्तब्ध संहिता
उमलतीये माझ्यात सावकाशीने

कॅन्टीनमध्ये तुझे दोन नग्न डोळे भेटले
शब्द शब्द भिडताना कपडे माझे पेटले
भाषेमध्ये होऊन नागवे देह दोन्ही बाटले
ओळखीला झाली युगे प्राप्त

कितीवेळा देह तुझा खांद्यावरून उडाला
जो पाणी होता तोही पाण्यामध्ये बुडाला
पृथ्वीचा बुडबुडाही जाऊन भिडला शिडाला
ईश्वराची नौका झाली स्थिर

जे पूनीत होते त्यात तूही चन्द्र घेऊन मग्न
पौर्णिमेच्या दवाखान्यात बुद्धही झाला रुग्ण

नियतीच्या चक्रामध्ये वर्षे व्हायची होती भग्न
जो जन्म झाला उत्सव झाला

आता ओलांडूनी दिशा ईश्वरदेखील ओलांडून
मोक्षाच्या आरश्यामध्ये मायेशी कृष्ण भांडून
साधनेच्या जात्यामध्ये तृष्णा साऱ्या कांडून
तू जवळी आलीस धन्य जाहलो

आता करू साजऱ्या लिला मांडू प्रपंच मायेचा
बद्ध मुक्त खेळताना धांडोळा घेऊ छायेचा
शिवशक्ती ओतताना फोडू पेला कायेचा
विरून जाऊ निर्वाणाच्या महाशून्यात

## तू नाहीयेस

तू नाहीयेस तुझ्या अभावाच्या कित्येक खूणा
माझ्या अस्तित्वशैलीत
आळस पहाडासारखा खाटेवर स्तब्ध
आणि मी महंमदासारखा अस्तित्वात नसलेल्या अल्लाच्या
सगुण आज्ञा शब्दात झेलत अंथरूणात पेलत
रॅकसॅकवर पुस्तकांची प्रेतं
टीव्हीत चेहऱ्यांचे मेकअपबाज थवे
माझ्या हातातील बेस्टसेलरला वाळवी गोंजारतीये
आणि मी भविष्यात दहा पाऊले टाकून
अस्तित्वाचा मूळ योजनेत परततोय
माझ्या प्रॉफेटीक इमेजीसच्या गांधीलमाश्या
घोंगावतायत माझ्यावर
आणि आत्म्याला बसणारे सेमीओटीक डंख
कंडीशनींग उलटसुलट करतायेत
दिग्दर्शक बनण्याचा माझ्या सर्व योजना
कोसळून पडलेत आयुष्याच्या पायाशी
आणि स्क्रीप्ट माहीत नसलेल्या ॲक्टरसारखा मी
बेबंद घोंघावतोय हस्तमैथुनात
तू आहेस असं समजून

## तू तर फक्त आवाज ऐकलास

तू तर फक्त आवाज ऐकलास
आणि मी फक्त मौनातच होतो
तुझं क्रौर्य अंगावरून गेलं तेव्हाही
चालत राहिलो अध्यात्मिक कुबड्या घेऊन
बुद्धत्वाच्या शोधात
युगांची हाक तर फोफावतच राहिली माझ्या कानात
सत्तर कोटी दारिद्र्याचा गेंडा धडकत राहिला घराच्या कोपावर
मला पंख फुटावेत म्हणून
ओतप्रोतलो तुझ्या स्तनावर
तर तुझा फेमिनीस्ट फुलपाखराने
सत्तेचा मध गोळा करून
गोडाऊन टाकले मला मायेच्या गोड लोणच्यात
आणि पंख फुटायच्या जागी शिंगे फुटलेलो मी
सिंहासारख्या डरकाळ्या फोडून
निमूट होऊन गेलो नंदीबैलांसारखा
आता कवितेच्या बैलगाडीत बसून
मला हाकारत चाललेला तुझा अहंकार
डौलात दौडतोय
आणि मी कधीतरी शिंगाची बासरी होईल म्हणून
सगळा रस्ताच वाजवत धावतोय

## कदाचित

कदाचित अश्रूंनी तरी कविता येईल सांधता म्हणून
मी डोळे रांधून
पोटभर घेतले रडून
तर सारेच शब्द उथळ खळखळाट करत गेले वाहून
पोस्टमॉडर्न पाण्यासारखे

आता उरलाय कागदात
काळाचा फडफडता आवाज
आणि अवकाशात
आयुष्याची मरून पडलेली सावकाश लेखणी
देखणी पण चकणी

*

# १०. परिशिष्ट

## रामदास समर्थ भटकळ

आयुष्यावरचे केस चाललेत उडत पण अस्तित्वाची त्वचा खणखणीत नितळ
पाहताना वाटते हा लढणार कसा पण अंगात सोळा हत्तींचे वैचारिक बळ
पाण्यासारखा निथळतो ह्याचा सर्वांना समजून घेणारा ऐसपैस समजूतदारपणा
आयुष्य उकलण्याचा पायांना लागलाय संशयकल्लोळी चोवीस तास चळ

सर्वांचाच सर्वांना आपला वाटणार पण कमळासारखा ह्याचा अलिप्त डोळा
साऱ्या चिखलांना चिखलात लोळवणारा तरीही कुस्तीत मात्र आविर्भाव भोळा
स्वतःला हवे तेच करणार पण मूड मात्र कायम तडजोडीस तयार
म्हणणारे म्हणतात हा साठ वर्षाचा झाला पण अंगात मात्र वय अजून सोळा

पुस्तक पचवताना थकून जातात लोक हा मात्र अवघे लेखक पचवून उभा
काढलीच नाहीत कधी लोकप्रिय पुस्तके तरीही म्हणे ह्याचा पॉप्युलर गाभा
चाचपत स्वतःला आजमावत जंगल घुसळत झाडांची अदृश्य आभा
हत्तीसारखा चालतो हा कळपात राहून जपत स्वतःचा सवता सुभा

हा चैतन्याचा गणपति पार्वतीचा ओरीजनल मळ हा रामदास समर्थ भटकळ
सर्वांनाच सापडणारा सार्वजनिक उत्सव हा ह्यालाही न गवसलेला आयुष्याचा तळ

## मुंबई

॥१॥

यानाच्या कॉर्टेशीयन चौकटीत चन्द्राचा लॅम्प
हायड्रोजनवर चालणारे सूर्याचे इलेक्ट्रॉनिक घड्याळ
डोळ्यातून शूट होणारी आकाशाची अधलीमधली ब्ल्यू फिल्म
नोटांच्या स्क्वेअरफूटमध्ये जगणारी नॉनॲग्रिकल्चरल लॅन्ड
ह्या सर्वव्यापी कम्प्युटराईज्ड आर्किटेक्चरमध्ये माझे नॉनकम्प्युटराईज्ड अस्तित्व

इथला प्रत्येक प्रोग्राम फिक्स
आणि मी मृत्यूइतकाच अनिश्चित
माझ्या देहातील जगण्याचा वास आसमंतात दरवळतोय
आणि आर्किटेक्चरचा आ वासलेला जबडा करोडो ईश्वर चघळतो

॥२॥

मुंबई
तुझ्या देहात मुंबई
तुझ्या देहापलिकडे मुंबई
तुझे स्तन मुंबईपासून सुरू होतात
मुंबईपाशी संपतात
तुझ्या मांड्या मुंबईपासून सुरू होतात
मुंबईपाशी संपतात
तुझे नाक तुझे ओठ तुझे डोळे तुझे कपाळ
सिमेन्टच्या लादीवर स्कायस्क्रेपर विठ्ठल सिमेंटचेच ट्रेनमध्ये वाजतात टाळ

॥३॥

मुंबईने कोल्हापूरात सिनेमे पाठवले
मी मुंबईत आलो
मुंबईने बांदिवड्यात नाटकं पाठवली
मी मुंबईत आलो
मुंबईने माझ्या घरात मसाला डोसा पाठवला
मी मुंबईत आलो
मुंबईने माझ्या शाळेत गाईडं पाठवली
मी मुंबईत आलो
मुंबईने सर्वत्र पसरवलेले साम्राज्य कॉर्डलेस
आणि
मुंबई वगळून श्वास घ्यायालाही शिल्लक न राहिलेली स्पेस
माझा देह शटल झाला
माझा देह सेटल होईल
इथली स्कायस्क्रेपर सिंफनी
लावण्यात देखील बीटल्स गाईल

॥४॥

मी XXळ पाण्यात बुडवला
मी XXबाच्या गांडीवर लाथ मारली
मी XXXXला व्यभिचाराने आमंत्रण दिले
मी XXXला ब्युटीपार्लरमध्ये पाठवून दिले
माझ्या लंडावर एक कंडोम काय चढला
सारे XX वीर्यासारखे गळून पडले

✱

श्रीधर तिळवे हे मराठीतील महत्त्वाचे कवी आहेत. ते ऐंशोत्तरीतील कवी आहेत का नव्वदोत्तरीतील कवी आहेत हा सध्या वादाचा मुद्दा असला तरी ते ऐंशोत्तरीचे शेवटचे व नव्वदोत्तरीतील पहिले कवी आहेत असे म्हणता येईल. मर्ढेकरांनी जे काम साठोत्तरी पिढीसाठी केले तसेच कार्य श्रीधर तिळवेंनी नव्वदोत्तरीसाठी केले. १९८२ ते १९८७ ह्या दरम्यान त्यांनी लिहिलेल्या त्यांच्या जुन्या कविता संग्रहरूपात प्रकाशित होणं गरजेचं होतं. 'डेकॅथलॉन' हा त्यांच्या बहुतांशी ह्या काळात लिहिलेल्या जुन्या कवितांचा संग्रह आहे.

डेकॅथलॉन हा अॅथलीटची सत्त्वपरीक्षा पाहणारा दहा क्रीडाप्रकारांना एकत्र सामावून घेणारा क्रीडाप्रकार! तिळवेंच्या जुन्या कवितांचे संकलन करताना जाणवलं की त्या देखील दहा प्रकारात विभागल्या आहेत आणि तरीही त्यांच्यात एकसंधता आढळते. गजलेपासून सुरू होणारा हा संग्रह मरणावलीत स्वच्छंदता वृत्ती प्रकट करतो. 'अफवा' ह्या विभागातील कविता परिवर्तनवादी वृत्ती प्रकट करतात. या विभागातील काही कविता 'एका भारतीय विद्यार्थ्याचे उद्‌गार' या काव्यसंग्रहात आल्या होत्या. या संग्रहात उर्वरीत कवितांचा समावेश आहे. 'गाथा' हा विभाग आध्यात्मिक अनुभवाची सृष्टी उभा करतो तर 'युरेका' या विभागात विचारप्रणालींचा मृत्यू झाल्यावर स्थितीशील पक्षात गतिशील होणाऱ्या कार्यकर्त्यांची घुसमट व्यक्त होते. 'बांधकाम चालू आहे' ह्यातील कविता आसपास सुरू असणारे अवकाशाचे बांधकाम आणि त्यातून प्राप्त होणाऱ्या निरर्थकतेकडे आपणास न्हेते. 'एकतर्फी' मधील कविता एकतर्फी प्रेम करणाऱ्या प्रेमीचा आकांत टिपते तर 'प्रिझम' मधील कविता शहर व कवी यांच्यामध्ये निर्माण होणाऱ्या संबंधांचे संवेदनशील चित्रण करते. हा संग्रह एका अर्थाने तिळवे ह्यांच्या कवी म्हणून झालेल्या जडणघडणीचा व वाढीचा आलेख आहे.

तिळवे ह्यांच्या कवितेतील अवकाशाचा आवाका प्रचंड आहे. कदाचित संत तुकाराम व नामदेव ढसाळ ह्यांच्यानंतर इतक्या व्यापक अवकाशाला सामोरी जाणारी ही मराठीतील एक अवकाशसमृद्ध कविता आहे. हा अवकाश सतत बदलत असल्याने आणि तिळवे ह्यांची कालीक संवेदना ही सतत बदलती आणि प्रवाही असल्याने त्यांची कविता आपणास सतत वाहते राहण्यास भाग पाडते. स्थिर संवदेनशीलतेची सवय झालेल्या मराठी रसिकतेपुढे म्हणूनच ती एक आव्हान बनून राहते.